॥ ॐ नमः पंचजगद्गुरुभ्यः ॥





श्री संत शिरोमणी मन्मथ स्वामी कृत

# श्री परमरहस्य

प्रकाशक – संस्थानमठ, माजलगांव

॥ ॐ नमः पंचजगद्गुरुभ्यः ॥

श्री सद्गुरु मिस्कीन स्वामी संचलित
तपोरत्नं ग्रंथमालेचे
प्रथम रत्न

# श्री परमरहस्य

श्री. जगद्गुरु रेणुकाचार्यांनी अगस्तमुनीला उपदिष्ट वेदांगउपनिषद्
प्रतिपाद्य सिद्धान्त शिखामणि सारगृहीत
श्री. संत शिरोमणि मन्मथस्वामी कृत
वीरशैव तत्वदर्शक असलेला
महान् परमपवित्र ग्रंथ

– प्रकाशक –
संस्थान मठ माजलगांव

द्वितीयावृत्ती प्रती २०००
मित्ती माघ शु॥ ५॥ शके १९०५ तारीख ७ फेब्रुवारी १९८४
( किंमत १२ रुपये )

– पुस्तके मिळण्याचे ठिकाण –

संस्थानमठ माजलगांव
जि. बीड (महाराष्ट्र)

श्री जगद्गुरु पंडिताराध्य
वीरशैव विद्यार्थी वसतिगृह
मकाई गेट जवळ, औरंगाबाद.

मुद्रक – वसुधा प्रिंटर्स, ८५/४ रविवार पेठ, सोलापूर.

॥ ॐ नमः पंचजगद्गुरुभ्यः ॥



श्री १००८ जगद्गुरु रेणुकाचार्य

# प्रस्तावना

संजीवन समाधी साधलेल्या संत सार्वभौम मन्मथ माऊलींचा 'परमरहस्य' ग्रंथ म्हणजे वीरशैवांचे विराट विश्वकाव्यच होय. माऊलीलीखित अनेक ग्रंथापैकी परमरहस्य हा ग्रंथ परमोच्च होय. त्या काळातील परपंथीयांच्या प्रचाराच्या उसळत्या लाटेंनी भेदरलेल्या भोळया भावडया भाविकानां-वीरशैवांना-'मन्मथ आलासे भूलोका, आता कोणीही भिऊ नका' अशी डरकाळी फोडून अभयदान दिले. श्री रेवणसिद्धेश्वर लिखित १७ अध्यायाच्या ३२५ श्लोकांच्या 'परमरहस्य, या मूळ संस्कृत ग्रंथावर प्राकृत टीका २०५२ ओव्यातून लिहून महामना मन्मथानी मराठवाडयाच्या माळरानातून मुक्ती मंदीराच्या मळयाचें महाद्वार मोकळे मांडले आहे. ग्रंथाच्या परमरहस्य या नामांभिधानातच परम अर्थ गुंफून परम आनंद निर्मिला आहे. तो लिहिणारांनी तरी उपभोगला असेलच पण प्रतिनित्य पारायण करणाराला सुद्धा निश्चित परम आनंद होऊन पुण्यप्राप्ती होईल.

शिवयोगी मन्मथ विरचित अनुभवानंद, गुरुनागौ, ज्ञानबोध, स्वयंप्रकाश, गुरुप्रसाद, गुरुगीता, शिवगीता आदि ग्रंथ व अनेक अभंग भक्तीरस प्रधान काव्यें कवनें लिहीलेली प्रकाशित आहेत. वीर सिंहासनाच्या, वीर गोत्रातील, वीर मन्मथाने, वीरशैवांच्या वृत्तीला, वीरउजाळा देणेसाठी, वीर विचार-मंथनातून. वीरहाकेतून, वीर कुंभ काढून वीर लेखणीतून 'परमरहस्य, हा वीर ग्रंथ व त्यामधील संस्कृत भाषेच्या सुवर्ण पानाआड लपलेले सुगंध गुह्य प्राकृत प्रकाशांतून प्रगटविले. कांही ग्रंथ अधिकारवाणीने तर काही साध्या सरळ सोप्या तर काही सुबोध सुगम मार्मिक तर काही कठोर शब्दातून लिहून सर्वांगी साज सजवलेला आहे. मात्र त्यामधून परधर्मीयाना व परपंथीयांना न दुखवेणचे कटाक्ष काटेकोर पाळलेले आहे. मन्मथाची ग्रंथसंपदा व अभंग संपदा फार मोठी असून साहित्याचे भांडारगृहच आहे. परंतु फार मोठे साहित्य अप्रकाशित आहे

**परम रहस्याचा परम परिचय-**

**अध्याय पहिला** – मन्मथ स्वामीनी हा ग्रंथ बालाघाट डोंगर कपारीतील कपीलधार येथें लिहीला. हा ग्रंथ शिवगौरी संवादात्मक आहे प्रारंभी गुरुला नमन केलें आहे. जगद्‌गुरु पंचाचार्य, शिवगण श्रोते यांनाही ग्रंथकर्त्याने

विनयानें नमन केलेले आहे. त्यानी ग्रंथकर्तृत्व आपलेकडे घेतले नसून हे शिव कृपेनेंच होत आहे असें म्हटले आहे. आपल्या स्वार्थासाठी शिवच हें सारे घडवीत आहे असें सांगितले आहे. मन्मथास गुरुकृपा झाली 'तुला वरदान असो' असा साक्षात दृष्टांत झाला. मुक्तीपद, धर्म, कर्म, याबाबत सोदाहरण पटवले आहे. अज्ञानांधकाराचा विनाश करणारा दैदिप्यमान सूर्य म्हणजेच सद्गुरु त्यास सदैव नमावे असें म्हटले आहे. याशिवाय विविधप्रकारें श्री. गुरुचे स्तवन केले आहे.

**अध्याय दुसरा–** या अध्यायात गुरुचे रूप वर्णन केले आहे व गुरुतीर्थाचे महत्त्व वर्णिलें आहे. वेद आणि क्रीयामंत्र सप्तकोटी पवित्र आहेत व तें माझे-पासूनच उत्पन्न होतात. साऱ्या तीर्थ क्षेत्रात भूकैलास काशी महावंद्य तीर्थ असून तेथें वास करणारा विश्वेश्वरासमान गुरु असून त्याचे पादोदक गंगोदक तीर्थ होय. गुरुतीर्थाच्या एका थेंबाचे फल सृष्टीतील हजारो तीर्थांच्या फला पेक्षा हजारो पटीनें अधिक आहे. मी. गुरुना श्रेष्ठ मानतो. त्याद्वारे मनाची सिद्धता होते. लिंगनिष्ठेनें सत्वर मोक्ष हाती येतो. गुरुला शिवस्वरुप समजून उच्चासनी बसवून साष्टांग नमस्कार करुन तीर्थासाठी त्यांची आज्ञा घ्यावी. गुर्वाज्ञा होताच सद्योजात मंत्र म्हणून आपण भस्म लावावे. तल्लीन-तेतून इष्टलिंगपूजा करावी. पुष्प धूप दीप नैवेद्य तांबूल देऊन जलपात्रात 'ॐ' लिहून सूळ मंत्र अंगुष्ठास ईशान वस्तू म्हणून उर्ध्व करानी दाखवावी. कोणत्याही अंगग अगर अभद्र गुरु अथवा स्वामी असल्यास त्याचे तीर्थ सेवन करु नये. धर्मन्याय नीती शील संभाळून वर्तंतो त्याची पादपूजा करावी.

**अध्याय तिसरा –**. या अध्यायात वीरशैवांचा मार्ग व लक्षणें सांगितली आहेत लिंग म्हणजे शिवाचे प्रतीक होय. त्याचेशिवाय जगणेच वीरशैवांना असह्य वाटते. त्याला शिवधर्माची निंदा मुळीच सहन होत नाही. तो परस्त्री माते-समान मानतो. हिंसा करीत नाही. निंदा नालस्ती कोणाची करीत नाही. त्याला निंदा स्तुती सर्व समान वाटते. लिंग हरवल्यास प्राणत्याग करावासा वाटतो. गुरुनें जन्मकाली दिलेले लिंग जीवनभर जतन करावे. वीरशैवांनी षड्काल पूजा केल्यास उत्तम, त्रिकाल पूजा केल्यास मध्यम, सकाळ संध्याकाळ दोन वेळा केल्यास अगर सकाळी एकवेळीस केलेस कनिष्ठ म्हटले आहे.

अध्याय चवथा— यामध्यें बद्ध–मोक्ष याची स्थिती निवेदन केली आहे. गुरु हा परब्रम्हस्वरुप आहे. तोच आपल्या जीवनाचा उद्धार करणारा आहे. निरंहकार व सदैव शांती जेथे वास करते. सर्व संकल्प विकल्प ज्याचे ठायी विलीन होतात हे ब्रम्हीचे लक्षण होय. स्वयं ब्रम्हस्वरुप होऊन भेदाभेद न मानणारा तोच मोक्ष होय. इंद्रियाची बोळपण केली, ध्यान धारणा साधनें निमाली, उन्मन मनही निमाले तोच मोक्ष जाणावा. सच्चिदानंदपद जाणून निरंजनघन स्वतःच झाला तोच मोक्ष जाणावा. संकल्प विकल्प यानें ज्याचें मन भरलेले आहे, मीच कुटुंबातील सर्वांना पोसतो हा दुरभिमान वाहतो ते बद्धतेचे कारण होय. जो बद्ध मोक्ष दोन ही जाणून सर्व साक्ष आहे त्याला बद्ध मोक्षाची बाधाच होणार नाही.

अध्याय पाचवा— गुरुदेव व महादेव यात काहीच भेद नाही. चतुर्दश भुवनात गुरुपेक्षा श्रेष्ठ दैवत नाही. गुरु भक्तास मातृप्रेमानें शिवपदी पोहोचवितो. ज्याच्या चरणकमली सर्व तीर्थे विराम पावली, सप्तसागर ज्याच्या चरणी स्थिर आहेत, ज्याचे चरणी महापर्वत देखील नांदतात, अशा गुरुच्या चरणी अनन्यभावे भावभक्ती ठेवून वागले पाहिजे, स्त्री पुरुषांना एकच गुरु असावा. त्यायोगे भवसागर पार होईल. अज्ञात न्हेने न वर्तल्यास स्त्री पुरुषात सौजन्य संभवत नाही- भिन्न विचार झाले तर तो अनाचार ठरतो. भेदभावाचा त्याग करून एकाच गुरुस भजल्यास यश कीर्ती वाढते.

अध्याय सहावा— या अध्यायात 'प्रकृतीकाया व ज्ञानकाया' यांचे स्वरूप सांगितले असून त्या दोहोतील भेद सविस्तर वर्णन केले आहे. त्याचबरोबर पंचाक्षरी व षडाक्षरी महामंत्राची महती स्पष्ट केली आहे. प्रकृतीकाया ही अविद्येने जखडलेली असते. गुरुनें दिलेले ज्ञानावरून व उपदेशावरून अविद्या नष्ट होऊन प्रकृतीकायेचे ज्ञानकायेमध्ये रुपांतर होते. शुद्ध भावाने सद्गुरुला शरण गेल्याने शुद्ध काया होते, शुद्ध काया प्राप्तीनंतर गुरुकृपेनें पंचाक्षरी अगर षडाक्षरी मंत्र प्राप्त झालेवर त्याची थोरवी वर्णन करणेस वाणी अपूरी पडते. ज्या देहात अज्ञान व अहंकार असतो ती प्रकृतीकाया होय. ज्ञानकाया अर्थात शुद्ध काया प्राप्त झालेवर 'ॐनमःशिवाय' या मंत्राचा जप करावा. पंचाक्षरी मंत्र प्रणवासह षडाक्षरी झाला आहे. ही सहा अक्षरे सहा चक्राच्या सर्व कर्माला

आधारभूत आहेत. ॐकाराचे मूळ सहस्त्र चंद्राच्या प्रभेप्रमाणें प्रकाशमान आहे. त्याला पाहून तेहतीस कोटी देवदेखील मौन धारण करतात.

**अध्याय सातवा–** वस्तू म्हणजे काय असा पार्वतीनें शिवास प्रश्न केलेला आहे. सूक्ष्म छिद्रातून पाहिल्यास अमरपुरीचें दर्शन घडून मूर्ती निर्गुण व अचल भासते म्हणून अव्यक्त असलेले मुक्तपणें कथन करता येत नाही. ते गुरुकृपेनेच ओळखावें लागतें तीच परवस्तू होय. ही वस्तू म्हणजे परतत्व अथवा परब्रम्ह होय. याचा नित्यनेमानें तप आरंभिल्यास पुण्यसंचय होऊन परमात्मां हृदयी विराजतो व याच्या अनुभवाने चैतन्य व विचारशक्तीचा गौरवानें ज्ञानध्वज फडकतो. आनंदी व सद्भावभरित अंतःकरणानें रात्रंदिन भजन व चिंतन करणे हा दुसरा मार्ग होय. ज्ञानकळा जाणणारा सद्गुरु श्रेष्ठ आहे व भक्तीत लिंगभक्तीश्रेष्ठ आहे. वीरशैवात स्त्रियांना ही लिंगपूजा करणेचा अधिकार आहे.

**अध्याय आठवा–** यामध्यें 'स्थावर व जंगम' यांच्या संदर्भात लिंग देह प्राण हें सर्व एकमेकांमध्ये कसे गुंफले आहेत याचे संपूर्ण विवरण केले आहे. इष्ट प्राण भाव ही लिंगाची प्रमुख खूण आहे. गुरुनें दिलेल्या मंत्राचा जप अगर गुरुने दिलेल्या इष्टलिंगाची पूजा सोडून अन्य मंत्राचा जप करणारे व अन्य देवतांची पूजा करणारे यांना शतमूर्ख असा कठोर शब्द मन्मथांनी निर्भिडपणें वापरला आहे. प्राणाची अमंगलता घालवलेशिवाय प्राणलिंगी होत नाही. त्यासाठी इंद्रियावर ताबा ठेवून जें भोक्तचा आहे तें लिंगार्पित करा व स्वयें लिंग होऊन प्राणलिंगी बना. ज्ञान व क्रीया याशिवाय प्रत्यक्ष मोक्षमार्ग गवसणारच नाही. शील क्रीया भक्ति अशा त्रिसूत्री धर्माचारानें वर्तल्यास स्वधर्माचा अंकूर फुटतो व परधर्माचा भ्रम तुटतो.

**अध्याय नववा–** पार्वतीने भक्ती व जंगम यांचे स्वरुप व प्रमुख दशकर्माची संस्काराची माहिती विचारली. शिव उत्तरलें स्वधार्माने व सदाचाराने वागतो नित्य शिवभक्ती करतो, एकनिष्ठेनें लिंगपूजा करतो, अन्य देवाना पाहात नाही, स्वतःची निष्ठा सोडीत नाही तो भक्त म्हणावा. जंगम हा जगभरित आहे, जगाचा आत्मा होऊन राहातो मी तूं पणाचा भास त्याला राहात नाही द्वेष मत्सर राग त्याला राहात नाही. परदुःखाचा भोक्ता असून आशारहित असतो तो जंगम समजावा. एकूण सोळा संस्कार आहेत त्यात दहा प्रमुख

आहेत. गर्भाधान हा पहिला, डोहाळयाचा दुसरा, जननापूर्वी तिसरा, जातकर्म चवथा, नामकरण पाचवा, अन्नभक्षण सहावा, शिशूला चालवणें सातवा, चौल आठवा, दीक्षा नववा, विवाह दहावा असें दशकर्म आहेत.

अध्याय दहावा-- यामध्यें लिंग व जंगम यांचे स्वरुप एकच असल्याचे महत्व सांगितलेले आहे. जंगमाला शीलाशिवाय सर्व गोष्टी हीन वाटतात. जंगमाला विवेकाचें भूषण असावें. सेवाधारीनें पदारुढ होऊन जंगमपद अथवा गुरुपद घेऊ नये. कपटानें घेतल्यास अधर्म होऊन कृतघ्न ठरेल. जंगम हा निराशा, निराभास, निर्मल व निजानंदी असावा

अध्याय अकरावा-- यात नाद रुप बिंदू कळा आणि षड्लिंग भेद यांचे निरुपण केले आहे. नाद म्हणजे शब्द, त्याचें स्थान विशुद्ध आहे. तो गुरुत्वास प्रसिद्ध आहे. म्हणून नादगुरु म्हणतात. योग्याना तो संकेताने जाणवतो बिंदू सदा लिंग-रूप भासतो. लिंग परब्रह्मस्वरुपी आहे म्हणून त्याला बिंदू म्हणतात. कळा ही आचाराच्या पोटी जाणावी, आचार नीती ही स्वधर्माची काठी जाणावी या काठीने मनुष्य मोक्षप्रत जातो. नाद, बिंदू, कळा, सर्व प्रसादीला मिळा-लेवर ऋद्धीसिद्धी प्राप्त होते. प्रसादी होऊ इच्छिणारांनी गुरुला शरण जावे, इष्टलिंगाची प्राण, अपान व्यान. उदान, समान ही पाच मुखें आहेत. महालिंग, आचारलिंग गुरुलिंग, शिवलिंग, जंगमलिंग, प्रसादलिंग ही षड्-लिंगे होत. ॐकार, नकार, मकार, शिकार, वाकार, यकार हे षड्आकार आहेत.

अध्याय बारावा-- कोणत्या लिंगाशी कोणते लिंग मिश्रित आहे याचें व षट्-स्थलांचे निरुपण या अध्यायात केले आहे. महालिंगाप्रती ॐकार, आचार-लिंगाप्रती नकार, गुरुलिंगाप्रती मकार, शिवलिंगाप्रती शिकार, जंगमलिंगा-प्रती वाकार, प्रसादलिंगाप्रती यकार असा आहे. हा नमःशिवाय पंचाक्षरी मंत्र प्रणवासह षडाक्षरी झाला आणि तो पंचमहाभूतांचा-पंचतत्वांचा अधि-कारी असून उत्पत्ती व लय यांचा कर्ता आहे. भक्त, माहेश्वर, प्रसादी, प्राण-लिंगी, शरण, ऐक्य ही षट्स्थळे होत. जंगम दिसताच आपपर भेद न मानता त्याच्या चरणी धाव घेतो ते भक्तस्थल. शुद्ध बुद्धी लिंगपूजेत लावून, आत्म-तत्वी निमग्न असून जंगमाची भक्ती करून गुरूला शिव समजून वागतो ते माहेश्वर स्थल. निर्धाराने लिंगार्पित केलेल्या प्रसादाची महिमा फार मोठी

आहे. त्यायोगे ऋद्धि सिद्धी वश होतात त्याला प्रसादिस्थल म्हणतात. प्राण व लिंग एकच आहेत म्हणून लिंगास देह अर्पण केला तर ते प्राणलिंगीस्थल होय सदाचारानें व सद्भक्तीनें लीन होऊन लिंगास व गुरूस शरण जातो तें शरण-स्थल होय. इष्टलिंगाची पूजा तल्लीनतेनें करून जो त्यात रममाण होतो. संसारसूख त्यागून लिंगरूपात निमग्न सदैव असतो तें ऐक्यस्थल होय.

अध्याय तेरावा– षट्स्थल व षड्लिंग यांचा मिश्रित भाव कसा व कोणत्या स्थळाशी कोणता हस्त संलग्न असा प्रश्न पार्वती विचारतांच शिव उत्तरले. भक्ताला आचारलिंग, माहेश्वराला गुरूलिंग, प्रसादीला शिवलिंग, प्राण-लिंगीला जंगमलिंग, शरणाला प्रसादलिंग. ऐक्याला महालिंग असे षट्स्थलाला षड्लिंग पूज्य आहेत. सुचित्तहस्त भक्ताला, सुबुद्धिहस्त माहेश्वराला, निर-हंकारहस्त प्रसादीला, सुमनहस्त प्राणलिंगीला, ज्ञानहस्त शरण्याला, भावहस्त ऐक्याला सांभाळतो. अशा प्रकारे षट्स्थलांना षड्लिंग शोभतात.

अध्याय चववावा– सहा हस्तांची उत्पत्ती कशी झाली व कोणत्या हस्ताने कोणत्या लिंगाची पूजा करावी अशी गौरी विचारता झाली. तेंव्हा शिव म्हणाले, वस्तूपासून भावहस्त, भावहस्तापासून ज्ञानहस्त, ज्ञानहस्तापासून सुमनहस्त, सुमनहस्तापासून निरहंकारहस्त, निरहंकारहस्तापासून सुबुद्धीहस्त, सुबुद्धीहस्तापासून सुचित्तहस्त असे उत्पन्न झाले. हे गौरी, सुचित्तहस्ते आचार-लिंगाची, सुबुद्धीहस्ते गुरुलिंगाची, निरहंकारहस्ते शिवलिंगाची, सुमनहस्ते जंगमलिंगाची, ज्ञानहस्ते प्रसादलिंगाची, भावहस्ते महालिंगाची पूजा अनन्य-भावे करावी. अशा तऱ्हेने पूजा करणारास मी प्रसन्न होतो. सोने दागिना, जल बुडबुडी, माती घट, वस्त्र तंतू यामध्यें जसा भेद नाही तसा माझ्यात व भक्तात भेद नाही.

अध्याय पंधरावा– जो पाच विषय भोक्ता आहे तो सर्वाठायी भोग भोगून अभोक्ताच आहे असा तो महालिंग सर्वांतर्यामी आहे. देहाचा त्याग केल्यावर प्राण त्याच्याशी समरसतो. अंतकाळी महालिंगाला स्मरण केले तरच ते पावतें. महालिंगामध्ये समाधी लावली तर जननमरणही तो चुकवतो. ज्यानें प्रतिनित्य पूजन व भजन केले व सदाचारी शीलवंत वर्तन केले व जागृती

सुषुप्ती अनुभवली त्यालाच अंतकाळी महालिंगाची आठवण होणार. यानंतर यमलोकाचे व तेथील स्थितीचे वर्णन केले आहे ते असे– जो सद्भक्ताची निंदा करतो, धर्मनीतीचा अवमान करतो, सदैव कुमार्गी वर्तन करतो, परस्त्री परधन इच्छितो त्याला यमदूत काचेच्या रसात स्नान घालतात, अग्निकुंडाची शिक्षा देतात, शस्त्राघातानें छेदन करतात, विंचू सर्प दंशवितात, नर्ककुंडात चद्रार्कापर्यंत बुडवतात. पुण्यवान माणसाला पुण्य अर्चन करणेसाठी मनुष्य जन्माला पाठवतात.

**अध्याय सोळावा–** या अध्यायात वीरशैव धर्माचें प्राचीनत्व व त्याचा विस्तार याचें विवेचन केले आहे. धर्मसंस्थापक पाचही आचार्यांची व त्यांच्या कार्याची सविस्तर माहिती दिली आहे. चारही युगात आचार्य अवतार घेऊन त्यानी धर्माचें प्रतिपालन केले. धर्माला ग्लानी आली त्या त्या वेळी त्यानी अभयदान देऊन तारले आहे. व त्यामधून धर्मरक्षणासाठी सातशें सत्तर गणांची निवड केली. त्यांची नांवे व थोरी वर्णायला वाणी अपुरी पडते. शिवानी पाचही आचार्यांचे गोत्र, सूत्र, प्रवर शाखा, दंड सिंहासन, कलश बीजमंत्र वगैरे यामध्यें संपूर्ण वर्णन केलें आहे.

**अध्याय सतरावा–** यामध्ये दीक्षा व विवाह आदि संस्कारावर विवेचन केले आहे व आचारधर्माचे निरूपण केले आहे. वीरशैव धर्माचें मूळ सोळा संस्कार असून त्यात मुख्य दहा मानले जातात. त्यापैकी शिवदीक्षा हा अत्यंत महत्वाचा संस्कार आहे. वयाच्या आठव्या वर्षी दिलेली दीक्षा उत्तम, सोळा वर्षांपर्यंतचा काल मध्यम, यापुढील कोणताही काल गौण होय. गुरूला मुख्यासनावर बसवून षोडशोपचारे पूजन करावे. मग गुरू प्रसन्न होऊन शिष्याला भस्म धारण करून पावन करतो व निद्रिस्त लिंगाला चैतन्य प्राप्त करतो. वीरशैवानें भस्म धारण केल्याशिवाय व लिंगार्पित केलेशिवाय कोणतीही वस्तू ग्रहण करू नये. गुरु हा भावाचा भुकेला असून जन्म जन्मांतरींची व्यथा नष्ट करतो, गुरूसेवेनें शिवत्वाची थोर पदवी प्राप्त होते. अशा तऱ्हेनें सतरावा व शेवटचा अध्याय पूर्ण.

मन्मथाचा काल माघ शुद्ध पंचमी दुंदुभीनाम संवत्सरे शके १४८२ (सन १५६०) ते भाद्रपद शु॥ तृतीया शके १५३५ (सन १६१३) पर्यंतचा

होय. त्यानी माघ शुद्धत्रयोदशी विक्रमनाम संवत्सरे शके १५२२ (सन १६००) ला 'वीरशैव धर्माचे बीजांकुर' असा अनमोल परमरहस्य ग्रंथ कपीलधार डोंगर कपारीत प्राकृतात लिहून संपविला. या ग्रंथात वीरशैव धर्माचे संस्थापकाची माहिती देऊन धर्माच्या तत्वज्ञानाचे, आचार धर्माचे, पूर्वपीठीकेचे आणि विकासाचे अत्यंत रेखीव वर्णन केले आहे. परमरहस्य हा मन्मथस्वामीचा तत्वविवेचनात्मक प्रमुख ग्रंथ होय. मी कांही व्युत्पन्न कवी नाही. व तत्वज्ञही नाहीं. असे विनयाने म्हणून परमेश्वर आपल्या स्वार्थाकरता हे सारे माझे हाताने घडवीत आहे. असेही म्हटले आहे. यातील सतरा अध्याय एकमेकाशी सूत्रवद्ध गुंफले आहेत. अध्यात्मिक उद्बोधन ही ग्रंथामागील प्रमुख प्रेरणा असून जनहिताची कळकळ ही त्याची बैठक आहे. भुक्ती व मुक्ती, धर्म व कर्म ज्ञान व विज्ञान यातील भेद स्पष्टपणे सांगितला आहे. यातील सतरा अध्यायांचा परस्पराशी एक अनुबंध असून सर्वात एक अंत:सूत्र आहे. या सर्वंच लेखनातून मन्मथ माऊलींनी एका आदर्श साधकाचे चित्र रेखाटून त्याच्या आचार विचाराचा आलेख उमटविला आहे. आदर्श वीरशैवांचे स्वरुपदर्शन उत्तम घडविले आहे वीरशैव मत व धर्म या संबंधीचे महत्वाचे सारे विवेचन यात साररुपाने आले आहे.

कोणत्याही लिखाणावर प्रस्तावना लिहिणे म्हणजे त्यातील लेखनरहस्य परमरहस्य रेखाटणें होय. प्रस्तुत ग्रंथ हाच मूळ 'परमरहस्य' आहे. त्यातील परमरहस्य पुन्हा उमटवून गुणज्ञ वाचकांना साखर गोड आहे अशी ग्वाही मी देण्याची जरुरीच भासत नाही. परमरहस्य या ग्रंथाचे अनेक वेळा मुद्रण झाले असले तरी देखील ते उपलब्ध नाहीत म्हणून संस्थानमठ माजलगांव यानी दि. १९-६-८३ रोजी औरंगाबाद येथील श्री. जगद्गुरु पंडिताराध्य वीरशैव विद्यार्थी वसतीगृहाचे उद्घाटनप्रसंगी प्रकाशन केले. त्याही सर्व प्रती अल्पवधीतच संपलेमुळे तपोरत्नं श्री. ष. ब्र. प्र. प्रभू पंडिताराध्य शिवाचार्य गुरु चंद्रशेखर शिवाचार्य संस्थान मठ माजलगांव यानी तपोरत्नं श्री. ष. ब्र. प्र. योगीराजेंद्र शिवाचार्य गुरु चन्नवीर शिवाचार्य बृहन्मठ होटगी यांच्या मार्गदर्शनातून दुसऱ्यांदा मुद्रण करुन सद्भक्तासाठी त्या उपलब्ध करुन अत्यंत अभिनंदनीय, आदरणीय व अनुकरणीय असें कार्य केले आहे. हा महदानंदच होय. नित्य वंदनीय या सद्गुरुद्वयांनी समाजाधारद्वयांनी, समाज चैतन्य-

द्वयांनी परमरहस्याची प्रस्तावना मी या लिहावी अशी आज्ञा केलेवरुन मी माझ अल्पमतीनुरुप लिहीली. मी या विषयातला ज्ञानी नाही पण प्रेमी मात्र जरुर आहे. तरी माझ्या लिखाणात कांही न्यूनाधिक असल्यास गुणज्ञ वाचक गोडच करुन घेतील.

प्रस्तावना लिखाणात प्रत्येक अध्यायातील विषय व सार याचीच माहिती रेखाटून त्यात संबंधित श्लोक अगर ओव्यांचा पुनुरूच्चार केला नाही. प्रस्तावना लिहिण्याच्या निमित्तेकरुन तपोरत्नं द्वयांनी माझ्या सर्वांगी जीवनोन्नतीस मूळ कारणीभूत मन्मथ माऊलींची अखंड सेवाच होय. या उचित भावनेतून अशा सत्सेवेची संधी उपलब्ध करून देऊन त्याप्रीत्यर्थं परम अर्थाची परम पावती दि. २४-१-८४ रोजी माझ्या ७५व्या वाढदिवसा प्रीत्यर्थं झालेल्या महोत्सव समारंभादिनी माझ्या करकमली दिली त्याबद्दल मी कृत कृत्य झालो अशी माझी मनोन्मन भावना आहे. हा परमरहस्याचा परमपवित्र ग्रंथ परमअर्थानें भरलेला असून ग्रंथकर्त्याच्या परम जन्मदिनी ग्रंथ लिखाणाच्या परम स्थळी प्रकाशन होतो हा ही परम योगायोगातील परम क्षणच असल्याबद्दलचा परम आनंद ओसंडत असलेल्या अवस्थेतून गरुड भराऱ्या मारणाऱ्या प्रस्तावनेच्या प्रपंचाला आवर घालीत आहे. इति ॐ
मन्मथ ज्ञान सिंधू व बसव बोल बिंदू एकरूप..

प्रकाशन – काल स्थल
माघ शुद्ध पंचमी शके १९०५
दि. ७-२-८४ कपीलधार.

गुरुभक्तशिरोमणि, धर्मालंकार, महाचार्य
सेवाचंद्र, शिवतत्वविशारद कवीभूषण,
रुद्रकौस्तुभमणि, समाजकार्यधुरंधर, धर्मरत्न
बसप्पा वीरभद्रप्पा वारद
उपाध्यक्ष श्री. मन्मथ स्वामी देवस्थान
पंचकमीटी कपीलधार.
अध्यक्ष श्री. मन्मथेश्वर देवस्थान सोलापूर

॥ श्री सद्गुरु प्रसन्न ॥



बालाघाट महायोगी **श्री. संत शिरोमणि मन्मथेश्वर**

( श्री क्षेत्र कपिलाधार )

॥ श्री सद्‌गुरु मिस्कीन स्वामी प्रसन्न ॥



श्री. ष. ब्र. तपोरत्नं प्रभुपंडिताराध्य गुरु चंद्रशेखर शिवाचार्य महाराज, संस्थानमठ माजलगांव.

( ग्रंथ प्रकाशक )

॥ ॐ नमः पंच जगद्गुरुभ्यः ॥



ॐ

श्री संत शिरोमणी मन्मथ स्वामी कृत

# परमरहस्य

श्री गणेशाय नमः । श्री गुरूभ्यो नमः जय जयाजी सदाशिवा । परब्रम्हा अद्वयानंद वैभवा । नमो तूज देवाधि देवा । परमेश्वरा जगद्गुरु ॥१॥ आता नमू चिच्छक्ति । जी जगन्माता पार्वती । अज्ञजना उत्तम गति । जयेचिया अनुग्रहे ॥२॥ वेदा परशिवा परब्रम्हा । नेणवे तुझा महिमा । साकार होवोनिया आम्हा । पुरविसी हेतू इच्छित ॥३॥ श्री सद्गुरु कृपेकरून । आधी नमू शिवगण । जे का अमर सर्वाहून । तयास प्रेमे शरण मी ॥४॥ रुद्रगणा तये परि । शरण रिघो ये अवसरी । शिवगणाची असे थोरी । ग्रंथांतरी न वर्णवे ॥५॥ असंख्यात शिवगण । आदिअनादि ते जाण । नित्यानंदी विराजमान । भक्ता पावन करीत असे ॥६॥ सातशे त्रेसष्ट गण । अवतीर्ण जे पुरातन । नुरोंदय्यादि शरण । महाविख्यात जे ॥७॥ सदाशिव

परशिव ।। सच्चिदानंद गुरुदेव । आचाराग्रणी स्वयमेव । सदा वैभव शिवाचे ।।८।। तीर्थ प्रसाद नेमेसी । जे सेविती अहर्निशी । आलस्य त्येजोनी प्रेमेशी । भक्तिभावे त्या शरण ।।९।। ऐसे नमुनी शिवगण । पंचाचार्य ते मुख्य जाण । जे वीरशैव कुलोत्पन्न । गण सृष्टी कर्ते जे ।।१०।। परि याचे अवतार । चतुर्युगात साचार । कोणकोणते नामधार । ईश्वर मुखी उद्भवले ।।११।। तया आचार्या करु नमन । रेवणसिद्ध मरुळसिद्ध जाण । तिसरा एकोराम ज्ञानियापूर्ण । चौथा तो पंडिताराध्य ।।१२।। हे चहुयुगी आचार्य चारी । मुख्य शिवाचारासी पुढारी । पांचवा असे सहकारी । विश्वार्या प्रति वंदिले ।।१३।। युग परत्वे आचार्य पांच । धर्म रक्षणार्थ अवतार साच । हे तो शिव आज्ञे करुनिच । प्रगट होती मृत्यू लोकी ।।१४।। तो नमू श्रीगुरु कैवल्य-दानी । अगम्य अगोचर अद्वैत निर्वाणी । अविनाश अनिव-र्चनी । अनुपम्य स्वामी ।।१५।। अनाम तू अपरंपारा । श्रीगुरुमुर्ती नागेश्वरा । नागेश हे अडनांव दातारा । एऱ्हवी अनाम तूं ।।१६।। तूज रुप ना रेखा नाम । आम्ही भक्ति धरोनी ठेविले नाम । एऱ्हवी वेदशास्त्रासी अगम्य । अगोचर तू ।।१७।। परि भक्ति लागी अकारलासी । गुरुरुप होऊनी तारीसी भक्तासी । म्हणोनी अज्ञापी परम रहस्यासी । टीका करावया ।।१८।। स्फूर्ति उन्मेश देओनी । स्वये वाचेची वाचा होऊनी । प्रेम रसे अक्षर घोळुनि । वाचेने

वदवी स्वामीया ॥१९॥ मी तव नेणे विवेक प्रबोधु । बोलो नेणे साहित्य संगीत शब्दु । येथ कृपा दृष्टीं पाहोनी प्रबंधु । चालवा स्वामी ॥२०॥ ऐसे विनवोनी भूमी विन्यासी माथा । तव कृपा आली श्रीगुरुनाथा । अशीरिणी वदे तत्वता वर असे तुज पैं ॥२१॥ तुवा जो भाव प्रकटविला आता । तोचि वर तुज दिधला तत्वता । प्रेमभावे करी आता । टीका परम रहस्याची ॥२२॥ श्रीगुरुवाक्य ऐकोनी कानी । कर कमल जोडिले दोन्ही । तुमचिया वरदाने ग्रंथ पूर्ण पणी । निर्मीन आता ॥२३॥ वक्ता येथे विश्वनाथ । श्रोते शिवगण समस्त । याते स्तवु जोडोनी हात । सावध व्हावे निरुपणी ॥२४॥ आता श्रोतिया श्रीगणा प्रथमा । विनऊ चरणावरी ठेऊनी माथा । सावध होवोनी निरोपनी आता । ऐका टीका परम रहस्याचीं ॥२५॥ शिवगणा सावध होईजे ऐसे । बोलिलो मी अज्ञान पिसे । ते सर्व काळ सावध असे । बोलिलो ते अन्यायें ॥२६॥ शिवगण कांही असती असावधान । म्या तयासी म्हणीतले व्हावे सावधान । ते सदा सावध म्हणोन । जगत्रय वर्ततसे ॥२७॥ तरी अन्याय क्षमा किजे । पितया सारिखे साहूनि जाईजे ॥ मज अपत्याते कृपा दृष्टीने पाहिजे । शिवगणा तुम्ही ॥२८॥ तुम्ही शिवगण प्रमथू । गणंगळ सत्यवादी कृपावंतु । मी तुमचे अनाथु । म्हणोनि सलगीने बोलिलो ॥२९॥ तुम्हा अवधान द्या म्हणीतले खोटे । तुमचे अवधान लाहून ईश

तुष्टे। ऐसे बोल निपजती ओठे। याचा अभिमान तुम्हा ॥३०॥ मी परिहार कासया देवू आता। तुमचे तुम्ही बोलवा ग्रंथा। टीका करवाल आपुलिया स्वार्था। मज कुंथा कुंथी कायसी ॥३१॥ ग्रंथ संवाद शिव गौरीचा। निज ठेवा तुम्हा शिवगणाचा। या लागी बोलवाल वाचा। आपुलिया सुखालागी ॥३२॥ तुम्ही सुखरुप सदा असा आनंदे। परि जडजीव तरती तुमचिया प्रसादे। या लागी टीका करवाल स्वानंदे। मज रंका कडोनी पै ॥३३॥ तव श्रोते शिवगण बोलती। आता परिहार देसी किती। शिव काय बोलिले पार्वती प्रति। ते निरोपी आता ॥३४॥ बरवे स्वामी म्हणोनी। मस्तक ठेविला चरणी। पार्वतीस बोधी शूळपाणि। तेचि निरोपु आता ॥३५॥ आधि पुसेल गुरु महात्म्य। मग पुसेल परम रहस्य उत्तम। गौरीने हृदयी धरोनी नेम। श्रवणी तत्पर झाली ॥३६॥ त्याच क्रमे हा परम ग्रंथ। आरंभी किंकर मन्मथ। श्रवणी श्रोते वीर शैव समस्त। ग्रीवानंदे डोलविती ॥३७॥

कैलास शिखरे रम्ये भक्तिसंधाननायक
प्रणम्य पार्वती भक्त्या शंकरं परिप्रच्छति ॥ १ ॥

कैलास शिखरी रम्य स्थळी। भक्ति साधन धरोनी हिम-नग बाळी। प्रणाम करोनी ते वेळी। पुसे शंकरासी ॥३८॥

दे. उ. भगवन् सर्वधर्मज्ञ ज्ञानविज्ञाननायक ॥
ब्रूहि मे कृपया देव गुरुमहात्म्यमुतमम् ॥ २ ॥

सर्व धर्मासी कोण जो धनी । ज्ञान विज्ञान वर्ते जया पासोनी । तो तू भगवंता कैवल्यदानी । वर्णी महिमा श्रीगुरुचा ॥३९॥

शि. उ. यो गुरुः स शिवः प्रोक्तो यः शिवः स गुरुः स्मृतः ॥
भुक्तिमुक्तिप्रदात्रे च तस्मै श्री गुरवे नमः ॥ ३ ॥

जो परमात्मा परमेश्वरु । तोची सदाशिव सर्वा गुरु । तोचि मुक्तिचा उदारु । निज भक्तासी ॥४०॥ तोची ज्ञान विज्ञान दायक। तोची कर्मधर्मासि सहाय्यक । तोचि तीर्थ व्रतासी नायक । सद्गुरु तोचि जाणिजे ॥४१॥

दे. उ. रुपं भुक्तेश्च मुक्तेश्च ज्ञानविज्ञानयोस्तथा ॥
कर्मधर्मस्य वा रुपं कथयस्व समासतः ॥ ४ ॥

आता भुक्ति मुक्ति कोण कैसी । ज्ञान विज्ञान म्हणावे कोणासी। धर्म आणि कर्म निर्णयासी । निरोपा म्हणे पार्वती ॥४२॥

शि. उ. लौकिकं सुखमात्यंतं भुक्तिरित्यभिधीयते ॥
निवृतिर्घोरसंसारसागरात्मुक्तिरुच्यते ॥ ५ ॥

शंकर म्हणे ओ गिरीजे। आता प्रश्न निर्णय ऐक ओजे । ऐकोनि हृदयी धरिजे । फल पाविजे विश्वासे ॥४३॥ ऐक

भुक्ति जे बोलिजे। अन्न धन संसार सुख जे जे । ते सद्युन् भुक्ति जाणिजे । देता मी ईश्वरु ॥४४॥ मुक्ति द्विविधा असती । एक त्या सगुणा चान्ही मुक्ति । काळाची कांबी होय गाजती । चहुचिया माथा ॥४५॥ निर्गुण पांचवी सायुज्यता जाणिजे । तेणे स्वये परब्रम्ह होईजे। देह असता जाता अखंड असिजे । वस्तुचि आपण ॥४६॥ तरंग क्षीर सागरीचा । भंगता न भंगे सागरुचि साचा । तेवि देह भंगता न भंगे ब्रम्हीचा । ब्रम्ह पुतळाचि तो ॥४७॥ स्वये स्वस्वरुप होणे आपण। नाही क्रिया कर्म बंधन। सोहं सिद्धि सदा सावधान । तेची मुक्तिपद पार्वती ॥४८॥ पिंड ब्रम्हाडीचा जाणोनि झाडा । सत्चिदानंदाचा निवाडा । करोनि जाणिजे निज तत्व पुडा । त्या नांव विज्ञान ॥४९॥ जाणोनी तेची होईजे । झाले पणाचा आठव आटिजे । जाणीव ज्ञानाची मग निमे सहजे । विज्ञान तेची जाण ॥५०॥ धर्म तो कुळीचा जाणिज । आपुले धर्मी निष्ठत्वे वर्तिजे । अधर्माची शीग निमे सहजे । तोची धर्म ओ देवी ॥५१॥ कर्म ते क्रिया जाणिजे । आपुलि क्रिया निपुण आचरिजे । निष्काम बुद्धि कीजे । तेची कर्म शुद्ध पै ॥५२॥ ऐसा जो भुक्ति मुक्ति ज्ञान विज्ञान दाता । धर्म कर्म सर्व क्रिया भोक्ता । ती सदाशिव सद्गुरु कर्ता हर्ता । ऐसिया सद् गुरुसी नमो नमो ॥५३॥

चैतन्यं शाश्वतं शांतं व्योमातीतं निरंजनं ॥
नादबिंदुकलातीतं तस्मै श्रीगुरुवे नमः ॥ ६ ॥

पिंड ब्रम्हांड सृष्ट सर्वांगी । व्यापक चैतन्य अंगसंगी । जडाते चेतवी चैतन्य रुपांगी । ऐसा सद्गुरु तो जाणिजे ॥५४॥ शाश्वत म्हणिजे सदा असत । अक्षयी अजर अमर सदोदित । म्हणोनि नामे शाश्वत । श्रीगुरुपद ते ॥५५॥ शांत म्हणिजे कांही कर्तृत्व नाही । षड्विकार षड्रूमि नुठति कांही । मन बुद्धि निमे म्हणोनि शांत पाही । सदा सद्गुरु स्वरुप ॥५६॥ व्योमातीत म्हणिजे आकाश रहित । निरंजन जनवन व्यापुनि अतीत । नादबिंदू कळा ज्योति रहित । ऐसिया सद्गुरुसी नमो नमो ॥५७॥

स्थावरं जंगमाधारं निर्मलं स्थिरमेवच ॥
जगद्वंदित पादाय तस्मै श्रीगुरवे नमः ॥ ७ ॥

पृथ्वी पर्वत वृक्ष स्थावर बोलिजे । चालते बोलते जंगम म्हणिजे । या समस्तासी अधार जे जे । ते गुरुपद बोलिले ॥५८॥ जो निर्मल त्रिगुण मलासी । जो स्थिर गंभीर व्यापक सर्वासी । त्रिलोक वंदिती ज्या पदासी । तया सद्गुरुसी नमो नमो ॥५९॥

स्थावरं निर्मलं शांतं जंगमं स्थिरमेवच ॥
व्याप्तं येन जगत् सर्वं तस्मै श्रीगुरवेनमः ॥ ८ ॥

स्थावर निर्मल आणि शांत । जंगम स्थिर समस्त । या

सर्व जगासी जो व्याप्त । तया श्रीगुरुसी नमो नमो ।।६०।।

ज्ञानशक्तिसमारुढस्तत्वमाला विभुषित: ।।
अज्ञानांध्वतमस्सूर्यंस्तस्मै श्रीगुरवेनम: ।। ९ ।।

जो ज्ञानशक्ति आरुढहोऊन । लेऊन तत्वमालाचे भूषण। जो अज्ञानांधकार छेदितभान । तया श्रीगुरुसी नमो नमो।।६१।।

अखंडमंण्डळाकारं व्याप्तं येन चराचरम् ।।
तत्पदं दर्शितं येन तस्मै श्रीगुरुवेनम: ।। १० ।।

जी वस्तू अखंड मंडळाकार । ती व्यापुनी असे चराचर । ते पद दाखवी जो निरंतर । तया सद्गुरुसी नमो नमो ।।६२।।

ब्रम्हा विष्णूश्च रुद्रश्च ईश्वरश्च सदाशिव: ।।
एते गर्भंगता यस्य तस्मै श्रीगुरवे नम: ।। ११ ।।

ब्रम्हा विष्णू आणि ईश्वर । सदाशिवादि सर्व अवतार । सृष्टीकर्ते गण साचार । शिवा पासुनि उद्भवले ।।६३।। हे सर्व गुरुचे सेवक । म्हणूनि सर्वा ज्ञान दायक । तेही गुरु-कृपेस्तव देख । गर्भा येती श्रीगुरुच्या ।।६४।। ऐसा श्रीगुरु समर्थ ज्याचे गर्भी विश्वनाथ । सदा राहे आनंदात । तया गुरुसी नमो नमो ।।६५।।

गुरुदेवो महादेवो गुरुदेव: सदाशिव: ।।
गुरुतत्वात्परं नास्ति तस्मै श्रीगुरवेनम: ।। १२ ।।

गुरु तोची महादेव । गुरुतोची सदाशिव । गुरु परता नाही

देव । म्हणूनी श्रीगुरुसी भजिजे ॥६६॥ ब्रम्हा विष्णू महेश । हेंहि श्रीगुरुचेची अंश । तेही ध्याती श्रीगुरुस । या लागी गुरुसी नमो नमो ॥६७॥

अज्ञानतिमिरांधस्य ज्ञानांजनशलाकया ॥
चक्षुरुन्मीलितं येन तस्मै श्रीगुरवे नमः ॥१३॥

अज्ञान त्रिगुण अंधकार । ज्ञानांजन लाऊन केला दूर । ज्ञान चक्षु प्रकाशिला निरंतर । तया श्रीगुरुसी नमो नमो ॥६८॥

भवारण्यप्रविष्टस्य मोहृदिग्भ्रान्तचेतसः ॥
येन मे दर्शितःपंथा तस्मै श्रीगुरवे नमः ॥१४॥

संसार रुपी अरण्यवनी । अहंभ्रांति भुलता दिशा भुलोनि । तेथे काम क्रोध सिंह व्याघ्र वेढुनी । ग्रासू आरंभिले ॥६९॥ तेथे भेटले अदृष्टे कृपा दानी । ज्यानी दुष्टश्वापदे टाकिली छेदुनी । सुपंथी लाविले शुद्ध बोधुनी । तया श्रीगुरुसी नमो नमो ॥७०॥

अनेक जन्मसंप्राप्तकर्मेन्धनविदाहिने ॥
ज्ञानानलप्रभावेन तस्मै श्रीगुरवे नमः ॥१५॥

अनंत जन्म प्राप्त का म्हणसी । कर्म धर्महीन वर्तता जनासी। दुःख भोगणे प्राप्त तयासी । म्हणोनी होती जन्म फेरे ॥७१॥ या लागी सद्गुरुसी शरण जाता । उपदेशी तो शिव बोध तत्वता । अष्टावरणाची महता । क्रिये सहित

सांगेतो ॥७२॥ गुर्वाज्ञेने स्वधर्मी वर्तता । ज्ञानानळे कर्म काष्टा समस्ता । उभेची दग्ध करी तत्वता । तया श्रीगुरुसी नमो नमो ॥७३॥

नमामि श्रीगुरुंशांतं प्रत्यक्षशिवरुपिणं ॥
शिरसा योग पीठस्थं परमोक्षप्रदायकं ॥१६॥

जो श्रीगुरु परम शांत । ब्रम्हरंध्री योग पिठी विराजित । जो का प्रत्यक्ष उमानाथ । मोक्षदायक भक्तासी ॥७४॥ हालऊनि नवचक्र मेळा । दाखवी महामायेच्या खेळा । दासा उद्धरी अवलीला । तया श्रीगुरुसी नमू ॥७५॥

दे. उ. केन मार्गेण भो स्वामिन् जीवो ब्रम्हमयो भवेत् ॥
कथमज्ञाननिवृत्तिः तत्सर्वं कथयस्य में ॥ १७ ॥

पार्वती म्हणे जगदीश्वरा । जे प्राणी देहधारी अवधारा । ब्रम्ह केवी होती चरेश्वरा । ते गुह्य सांगा मज ॥७६॥ जेणे प्राप्त होय शिवयोग । जेणे समरसे लिंगी अंग । ऐसे गुढ तत्व अव्यंग । निरोपा मज लागी ॥७७॥

शि उ यस्य देवे पराभक्तिर्यथा देवे तथा गुरौ ॥
तस्यैते कथिताह्यर्था प्रकाशंते महात्मनः ॥ १८ ॥

ईश्वर म्हणे वो पार्वती । गुरु तोची देव जाणती । सद्भावे सदा अर्चिती । ते जाणती निज तत्वा ॥७८॥

प्रातः शिरसी शुक्लाब्जे द्विनेत्रम् द्विभुजम् गुरुम् ॥
वराभयकरम् शांतम् स्मरेतन्नाम पूर्वकम् ॥१९॥

प्रातःकाळी उठोन । आसनी बैसावे सावचित होऊन । मग भावे करावे ध्यान । श्रीगुरुचे ॥७९॥ जे का शुभ्र सहस्त्र-दळ कमळ । त्याची जी कलिका शुद्ध निर्मळ । तया ठाई अविकळ । ध्यान करावे प्रेम भरे ॥८०॥ आणिक सांगतो तुज एक । जो द्विभुज द्विनेत्रदेख । वर द्यावया आवश्यक । एक मुख शोभतसे ॥८१॥ जरी वदने अनेक असती । तरी वर न पावे निश्चती । म्हणोनिया आत्ममूर्ति । जगा माजी प्रवर्तली ॥८२॥ गुरुपादोदके करुन । नित्यदेहाचे होय क्षालन । तरी जन्मांतरीची पापे जळून । दिव्य शरीर होय पै ॥८३॥

प्रसन्नवदनाक्षं च सर्वदेवस्वरुपिणं ॥
तत्पादोदकधाराश्च निपतंति स्वमुर्धनि ॥ २० ॥

श्रीगुरुमुर्ती शांत सगुण । अद्वितीय प्रसन्न वदन । सर्व देव स्वरुप म्हणोन । पूर्ण ब्रम्हरुप तो ॥८४॥ गुरुपादोदकाची धार । पडतसे स्वमस्तकी वारंवार । ऐसी भावना सत्वर । करावी शिष्य वर्ये ॥८५॥ तया अमृत धारे करुन । होय गुरु बीजाक्षराचे संजीवन । नित्य नवे बोधांकुर जाण । प्रगट होय अंतरी ॥८६॥

तीर्थानि दक्षिणेपादे वेदास्तन्मुखमाश्रितः ॥
सुजयेदर्चिततनुं तदृभिधानपूर्वकम् ॥ २१ ॥

तयाचे दक्षिण चरणी । वसती सर्व तीर्थे जावोनी । वेद

सुखाचा आश्रय करोनी। राहे तेथेंचि आनंदे ॥८७॥ ऐसिया सद्गुरूनाथाचे। भावे पूजन करावे साचे। नाम स्मरता जन्माचे। सार्थक होय तत्वता ॥८८॥

काशीक्षेत्रनिवासोसौ जान्हवीचरणोदकम् ॥
गुर्विश्वेश्वरः साक्षात् तारकम् ब्रम्ह निश्चितम् ॥२२॥

भू कैलास वाराणसी। पुरी विराजीत काशी। सप्तपुरीयात अविनाशी महातीर्थ वंद्यजे ॥८९॥ तेथे असे विश्वेश्वर। तैसाच मानिला गुरु साचार। उभय चरण स्पर्शी नीर। तेच तीर्थ मानिलेसे ॥९०॥ गुरु चरणीचे जे तीर्थ। जान्हवी सारिखेची निश्चित। त्या वेगळा भावार्थ। करु नये गुरु भक्ते ॥९१॥ ज्या ज्या तीर्थी आहे पाणी। ती ती शिवाची पाय धुणी। परि तेची उत्तम म्हणोनी। अभिषेकिती देवाते। ९२॥ तैसेची गुरुचरणीचे उदक। परम पवित्र पावन देख। त्याचा करीता अभिषेक। संतोषित गौरी मी ॥९३॥ आता सांगणे निश्चित एक। भावे जाणल्या तीर्थ तारक। तैसे नोव्हे गुरुपादोदक। साक्षात ब्रम्हदायक असे ॥९४॥ येथे संपऊनी गुरु महिमा। पुढे रहस्या वदवी पर-मात्मा। तया श्रोतिया प्रत्यगात्मा। होओनिया तुष्टवी ॥९५॥ जो असेल साच वीर। तया हा ग्रंथ भवपार। करोनि देईल मुक्ति थोर। सायुज्य ती निर्वाण ॥९६॥ इतिश्री परमरहस्य सारामृत। उमामहेश्वर संवादी वर्तत।

त्याची टीका करोनी पाकृत । कृत कृत्य मन्मथ ।।९७।।

इतिश्री परमरहस्यें हर गौरी संवादे । श्रीगुरु महात्म्यवर्णनम्
नाम प्रथमाध्याय: समाप्त: ।। श्लोक २२, ओव्या ९७



## अध्याय २ रा

श्रीगुरुभ्यो नम: प्रथम अध्यायी गुरुस्तव । करोनी श्रोत्या सावयव । प्राकृत भाषी अभिनव । गुरुरुप वर्णिले ।।१।। जो साक्षात् शिवस्वरुप । जो तेजे प्रचंड प्रताप । जो वीरशैव धर्माधिप । मोक्षदायक जगताते ।।२।। आता द्वितीय अध्यायी साचार । तीर्थमहिमा वर्णिला फार । परसोत श्रोते चतुर । सावध होओनिया ।।३।।

दे. उ. श्रीगुरुपादतीर्थस्य सेवने किं फलं प्रभो ।।
तन्महिमा श्रोतुमिच्छामि कथयस्व महेश्वर ।। २-।।

पार्वती पुसे जी महेशा । गुरुपाद तीर्थाचा महिमा कैसा । कोण फळ स्वयं प्रकाशा । निरोपा स्वामिया ।।४।।

शि. उ. मत्त: प्रवृत्ता:वै सर्वे वेदा यज्ञास्तथा क्रिया: ।।
मद्रुपो हि जगन्मान्यो जंगम: परमोगुरु: ।। २.।।

शिव म्हणे ओ गिरीजे । तुवा प्रश्न केला ओजे । तो आता निरोपु सहजे । तुझिये आवडी ।।५।। क्रिया आणि वेद मंत्र । मज पासून सर्वत्र । उत्पन्न होती पवित्र । सप्तकोटी मुख्य

जे ॥६॥ त्याची जी जीवन क्रिया । ती असे जंगम प्रिया म्हणोनि गुरु आचार्या । श्रेष्ठ जाणे मी देवी ॥७॥ क्रिया चार सतेज असता । तेणे मंत्राची होय सिद्धता । लिंग निष्ठे मोक्ष येई हाता । क्षण न लागता साच पै ॥८॥

लिंगप्राणगुरुर्देवी गुरोः प्राणं तु जंगमः ॥
जंगमस्य प्रसादेन लिंगे प्राणं तु शांकरी ॥ ३ ॥

शिवसांगे अंबेप्रति । मम प्राण गुरु मुर्ती । गुरु प्राणाची स्फुर्ति । जंगम रुपे तिष्टतसे ॥९॥ तया जंगम प्राणाची व्याप्ती । प्रगट होय त्रिजगती । सकल व्यापार चालती । मदइच्छे करुनिया ॥१०॥ ती रहावी अखंड स्थिती । म्हणूनि निष्ठा गुरुतीर्थी । षोडषोपचार पुजा करिती । अंति घेती शिवतीर्थ ॥११॥ एका गुरुचे पुजे करुन । त्रय मुर्तीचे घडे अर्चन । तया श्रीगुरु लिंगा व्यापून माझे रुप असे ॥१२॥ गुरुपुजा करीता जाण । आदी किजे लिंग पूजन । सवेची स्पर्शी द्वय चरण । वरी मस्तक ठेवोनिया ॥१३॥ लिंग रुपी मी साक्षात । ब्रम्हनत्वी वास करीत । चरलिंग तोची वर्तत । पवित्र पावन सत्य पै ॥१४॥ यास्तव तीर्थ अविनाशी । श्रुतीने वर्णिले प्रेमेशी । चरणं पवित्रं विततं ऐसी । मंत्रे जाण तीर्थाचे ॥१५॥

शोषणम् पाप पंकस्य दीपनम् तेजसः ॥
गुरुपादोदकम् शुद्धम् संसारद्रुमनाशनम् ॥ ४ ॥

शंकर म्हणे ओ गिरिजे । पापलक्षण चिखल जे । त्याते शोषावया समर्थ जे । ते गुरुतीर्थ ओ देवी ॥१६॥ ते गुरु तीर्थ विश्वासे सेविता । हृदयी ज्ञान दीप प्रकाशे तत्वता । संसार द्रुम उन्मळोनी सायुज्यता । ती लाहे ओ देवी ॥१७॥

दे. उ · पादोदकविधिः किदृग् कार्यं पादोदकम् कथम् ॥
तत्सर्वं कथ्यतां गुह्यम् परमेश दयानिधे ॥ ५ ॥

पार्वती म्हणे हे महेश । गुरुतीर्थ जे अविनाश । ते कैसे करावे विधीस । सत्य सांगा मजलागी ॥१८॥

शि. उ. प्रणम्यदण्डवद्भूमौ निष्ठया परयामुदा ॥
गुरोः संपुजयत् पादौ गंध पुष्पाक्षतादिभिः ॥ ६ ॥

शिव म्हणे ओ गिरिजे । तुवा तीर्थ विधी पुसिला ओजे । तो सांगेन तूज सहजे । श्रवण करी आदरे॥१९॥गुरु शिव एका भावेन । तया उत्तम आसनी बैसऊन । साष्टांग प्रणिपात करुन । आज्ञा घेईजे तीर्थासी ॥२०॥ भूमि प्रणाम दण्डवत घालुनी । चरण गुरुचे निष्ठे अर्चोनी । गंधाक्षता धूप दीपे पुजोनी । तीर्थ सेविजे विश्वासे॥२१॥गुरु आज्ञा करी प्रेमे । लवलाही उठा नेमे । धूप दीप अनुपमे । पूजा कीजे त्रिविध ॥२२॥ सद्योजात मंत्रे करुन । ते भस्म लावावे आपण । क्षणामाजी नम्र होऊन । इष्टलिंगा पूजिजे ॥२३॥दंशागुले चरण कमळी । स्पर्शोनि शुद्धोदक मिळी । भस्म लावून तये वेळी । सव्यभागि ठेविजे॥२४॥मग किजे

लिंग पूजा । निर्जराच्या निज बीजा । पत्र पुष्प धूप राजा । अर्पिता पुण्य पै ॥२५॥ महापुजा ती सर्वांगी । अर्चुनिया शिवयोगी । अंती किर्ती होय जगी । पुष्पांजळी अर्पिल्या ॥२६॥ नैवद्य तांबुल दक्षिणा । देईजे मौने तत्क्षणा । पुजा सर्व उतरुनि जाणा । चरण धरिजे आवडी ॥२७॥ पात्री प्रणव लिहूनि । मूल मंत्र अंगुष्ट स्थानी । ईशान वस्तू म्हणूनि । उर्ध्व करी दाविजे ॥२८॥ पूर्वी उदके उपपात्र । ठेविले लावून सर्वसूत्र । तेंचि घेऊनि पवित्र । तीर्थ किजे परवस्तू ॥२९॥ मागे जी सांगितली श्रुति । ती येथे आदरे उच्चारिती । जयजयकारे गर्जति । मग सेविती तीर्थाते ॥३०॥ गुरुतीर्थ पात्री असता । लिंगीलीन होय तत्वता । मुखा माजी प्राशन करीता । जंगम तीर्थ साच ते ॥३१॥ हेंचि जाणिजे त्रिविधा । दुजे असे दशविध । परी ते दश त्रिविध । होत असे अनुक्रमे ॥३२॥ ही परसूत्राची मूर्त । याचे कैसे सेवावे तीर्थ । म्हणे तो नोव्हे शिवभक्त । लिंगधारी वा जंगम ॥३३॥ तीर्थी भेद धरिता घडे दोष । प्रसादा उच्छिष्ट पाप विशेष । जो जाणे तीर्थ प्रसाद नेमास । तोची वीरशैव जाणावा ॥३४॥ जे तीर्थ परम पद दायक । जे होय भव भय मोचक । तया धिःकारीता महा पातक । भोगी जाण अभक्त तो ॥३५॥ तीर्थ झालिया जाय उठून । किंवा धरुन बैसे अभिमान । तो पंचमहा- पातकी जाण । जंगम अथवा भक्त ॥३६॥ जो म्हणे आणा

बैसल्याठायी । आचार विधी नेणेची काही । तो वीरशैव मार्गीचा नाही । गणवंशज नोव्हे तो ॥३७॥ तीर्थासी घे म्हणू नये । कोणाहि पाचारु नये । पाचारिता दोष होय। तो सांगता नये येथे ॥३८॥ दाटून म्हणे घे घे तीर्थासी । अवलिले पाचारिता अन्यासी । न घेता घे म्हणणारा दोषासी । पावे जाण तो देवी ॥३९॥ जो वीरशैव मार्गी पुरुष । घे म्हणणे नलगे तयास । ज्याचा तीर्थ प्रसादी विश्वास । कदा काळी न सोडी तो ॥४०॥ तीर्थाचा वस्त्रास पुसू नये हात । भूमि पाडू नये किंचित् । आदरे सेवी तो जंगम भक्त । येरे ते सोंग बहुरुपियाचे ॥४१॥ निगुरुया तीर्थ न दिजे । गुरुपुत्रासी न वर्जिजे । लिंग भक्ति सोडून अन्य देवता पूजिजे । तीर्थ न दिजे तयासी ॥४२॥ ऐशिया भ्रष्टास तीर्थ देता । तो जंगम नोव्हे सर्वथा । आशा अथवा भीड धरीता । तरी तो दोषी होय की ॥४३॥ आचार मार्गाचे ठायी । राव रंक सारिखाची पाही । मार्ग चुकता अग्रेसरहि येई नीच पदासी ॥४४॥ मार्गे चाले तो पंचाननबोलिजे । अमार्गे वर्ते तोची श्वान जाणिजे । वीरशैव मार्गे वर्ते तो सहजे । गुरु सर्वासी वो देवी ॥४५॥ सप्त सागरीचे जल । सृष्टीची तीर्थे सकल परि गुरुतीर्थ थेंबाचे फल । सहस्रांशे अधिक ॥४६॥ गुरुतीर्थ बिंदुची सरी । काशी न पावे बरोबरी । मा इतराची काय थोरी । पादतीर्था पुढे वर्णावया ॥४७॥

काशी मेलिया मुक्ति देत । सद्भावे सेविता श्रीगुरुतीर्थ। तो सहज होय जीवन्मुक्त । तीर्थ महात्म्य ऐसे हे ।।४८।। गंगातीर्थी एक अवगुण । खोली जाता जाय बुडोन । गुरु तीर्थ न बुडवी म्हणून । तरुनी जाती कैलासी ।।४९।। द्वाद-शलिंगा करिता परिक्रमा । परि गुरुतीर्थाचा नये महिमा। जेणे पाविजे स्वये परब्रम्हा । त्याची सरी कोण करी ।।५०।। तीर्थाविण बांधिता लिंग। तरी तो पाषाणचि चांग। जया तीर्थाचे न लागे अंग । तरी तो लिंगचि नोव्हे ।।५१।। तीर्था विणे लिंग तो पाषाण । तीर्थ असे लिंगाचे जीवन । त्याविना नसे लिंगासी चैतन्य । लिंग प्रेतासमान ते ।।५२।। तीर्थाविण लिंग अकारण । तीर्थाविण भक्ति निष्कारण । तीर्थाविण मिरवी जंगम जाण । कैकाडियाचे मर्कट ते ।।५३।। स्वधर्मी निष्ठी नसे जाण । व्यर्थ मिरवी जंगमपण । तीर्था सांडून करि कारण । जैसे भाषण अर्भकाचे ।।५४।। जयासी तीर्थी नाही आवडी । प्रसाद सेवावयाची काय ती गोडी । तयासी सुटका नसे संसार बांधवडी । कल्पकोटी गेलिया ।।५५।। विश्वासे जे सेविती तीर्थ । ते सरते होती शिवगणात । तया पुढे भुक्ति मुक्ति राबत । कर जोडुन सर्वदा ।।५६।। जो तीर्थ प्रसादाचा भेद जाणे । वीरशैव तयासीच म्हणणे । येरते हिंडती पोटा कारणे । भाट नागर जैसे ते ।।५७।। तीर्थ करावे जयाचे । शुद्ध सर्वांग असावे तयाचे । तीर्थ न करावे अंग हिनाचे । ऐसे शास्त्र वदतसे

॥५८॥ हातीचे अथवा पाईचे । बोट गेले असेल जयाचे । अंग असेल व्यापिले रोगे तयाचे । तीर्थ बोलिले नाही ॥५९॥ नाक डोळा कान । गेला असेल छेंदून । तयाचे तीर्थ सेवन । करु नये हो देवी ॥६०॥ जो क्रोधी द्वेशी तामसी । जो जंगमद्रोही करी हिंसेशी । सेवू नये तयाचे तीर्थासी । परि भोजन घालिजे ॥६१॥ अंगी कुष्ट असता। पादपूजा न कीजे सर्वथा । जो शिवगण सर्वांगी पुरता । पाद पूजा किजे तयाची ॥६२॥ पुज्य मूर्तिसी द्वेषे करुन । जरी लाविले अन्य दुषण । तरी तो अपुज्य होय जाण । दोष मुक्त पावे तो ॥६३॥ या लागी भूरुद्र देशिकांनी सर्वदा अलगत्वे वर्तावे जनी । अधिकार गुरुत्व पूर्णपणी । संपादावे निर्दोष ॥६४॥ जो शिवयोगी पाहता । निर्दोष मूर्ति असे तत्वता । तोची पुजे योग्य धर्म वक्ता । लिंगी निष्ठा असे ज्याची ॥६५॥ सुशील शांत आणि भाविक । जंगम भक्ति नित्य साधक । धर्म अधर्मी करी विवेक । पादपूजा किजे त्याची ॥६६॥ सत्वगुणी भक्त जन । तो आवडें प्राणाहून । उभय ऐक्य झाल्या विण । पुजा नोव्हे सर्वथा ॥६७॥ उभयता शुद्धासने । असावी दुकूल परिधाने । पुजा तीर्थां ते सेवने । आसन स्वकरे काढी का ॥६८॥ ऐकोनि तीर्थ महिमा । परमसुख पावली उमा । म्हणे धन्य धन्य पर – मात्मा । सदाशिवा स्वामी ॥६९॥ तुम्ही जो निरोपिला तीर्थ महिमा । तो न कळे निगमागमा । वीरशैवा वाचोनि

पुरुषोतमा । न कळे कोणासी ॥७०॥ वीरशैव कोण ते निरोपु आता । देह सांडी तो क्रिया चुकता । मा वाचेल लिंग जाता । हे केवी घडे ॥७१॥ ऐसे एकनिष्ट वीरशैव। मज कळविले उमाधव । परि धर्मशास्त्राचा प्रभाव । पुढे अर्थ रस बहू ॥७२॥ इतिश्री परमरहस्य सारामृत । उमा महेश्वर संवादी वर्तत । त्याची टीका करुनि प्राकृत । कृत कृत्य मन्मथ ॥७३॥

इति श्रीपरमरहस्ये हरगौरीसंवादे श्रीगुरुमहात्म्यवर्णनम् नाम द्वितीयोध्याय: समाप्ताः ॥ श्लोक ६, ओव्या ७३



## अध्याय ३ रा

श्रीपरब्रम्हणे नमः द्वितीय अध्यायी परम पावन। निरोपिला तीर्थ महिमा जाण । वीरशैवाचे मुख्य लक्षण । गुरुभक्ति वर्णिली ॥१॥ वर्णिली तैसीच गुरुमुर्ती । ती कैसी पूजावी प्रेम प्रीति । आनंदूनि जगदंबा पार्वती । प्रश्न करी शंकरासी ॥२॥

दे. उ. को मार्गोवीरशैवानां का स्थिति का च धारणा ॥
का पुजा लिंग निष्ठा का ब्रूहि मे परमेश्वर ॥१॥

कोण मार्ग स्वामी वीरशैवाचा। स्थिती धारणा कोण नेम तयाचा । कैसा नियम लिंगार्चनाचा । तो निरोपा स्वामी ॥३॥

शि. उ. लिंगार्पितम् विना भुक्ते नामृतम् विषमप्यथ ।
गते लिंगे त्यजेत्प्राणम् वीरशैवः स एव हि ॥ २ ॥

शिव म्हणे ओ गिरीजे । आता वीरशैव सांगू ओजे । जया मार्गासी म्या वंदिजे । गुरुभावनेने ॥४॥ लिंग हाची जयाचा प्राण । तो हरवताची सोडी प्राण । ऐसे हे वीरशैव लक्षण । जाण देवी साच पै ॥५॥ जो मार्ग पतित पावन । त्या मार्गे जो चाले तो विरक्त पूर्ण । त्यासी वंदिता तुटे बंधन । चौऱ्यांशीचे ॥६॥ जो वीरशैव मार्गी पुरता । तो क्रिया निष्ठे आचरे शुद्धता । अणुमात्र क्रियाभंगता । देहची टाकी ॥७॥ लिंगार्पित केलिया वाचून । कांही पदार्थ न करी सेवन । पात्री अर्पिल्या विष म्हणोन । न सोडी कदापि ॥८॥ लिंग निष्ठा परिपूर्ण । तो लिंगी असे लिंग होओन । लिंग गेलिया प्राण । राहे केंवि तयाचा ॥९॥ अधीच लिंगी प्राण भरला असे । तो लिंगची होओनि बसे । लिंग गेलिया तो उरे ऐसे । केंवि घडे ॥१०॥ लिंग हृदयीचे जीवन । लिंग प्राणाचा प्राण । लिंगामाजी मिश्रित होऊन । असे जो का ॥११॥ ते लिंग गेलिया देह ठेवी । हे ऐसे न घडेची देवी । पति गेलिया वाचणे जीवी । तरी ते नोव्हे पतिव्रता ॥१२॥ तैसे लिंग गेलिया जो राहे । तो वीरशैवचि नोव्हे । प्राण गेलिया देह । प्रेतची बोलिजे ॥१३॥ जयाचा प्राण लिंगी भरला । तो कैसा असे देहि उरला । लिंग गेलिया देही संचारला । पिशाच वत जाणिजे ॥१४॥

लिंगाविण वाचणे । ते प्रेतासम जाणणे । कि भ्रतारविणे जिणे । विधवा जैसी ॥१५॥ विधवा झाली तरी काय होते। देवे काय उणे केले दुर्जियाते । या ते उत्तर देईजेल ते। परिस वो देवि ॥१६॥ जरी तीने दुजा भ्रतार केला । तरि पाटकरीण म्हणती तीला । सवाशीण पणाचा महिमा गेला । देवी धर्मी नाही ती ॥१७॥ तेंवि लिंग गेलिया बांधी आणिक । तो पाटकरणी समान देख । वीरशैव नोहे पोट वाईक । वेषधारी बोलिजे ॥१८॥ म्हणोनि एक निष्ठे वर्तिजे । गर्भकाली प्राप्त शिवलिंगजे । तयासीच प्रेमभावे पुजिजे । एक निष्ठे करुनिया ॥१९॥ तोची प्रेमे करावा जतन । वीरशैवाची जी मूळ खूण । ग्रंथांतरी अवलोकून । भ्रष्टाचारे न वर्तावे ॥२०॥ म्हणोनि लिंगा माजी जयाचा प्राण । तोचि वीरशैव महागण । क्रिया कर्म निष्ठा पूर्ण । तारक शिवाचारासी ॥२१॥ भवी देखता अणूमात्र । न आचरे स्वकर्म तंत्र । भवीने सेविले जे पात्र । ते हाती धरीना ॥२२॥ इंद्रियाचे द्वारी न बैसे । अंतरी आत्म ओवरी असे । तो बाहेर कदा येत नसे । स्वसुखी रतला सदा ॥२३॥ तयाचिये लागता चरणी । कृपा करी तेचि-क्षणी । अजात भक्त नयनी अश्रुपात होतसें ॥२४॥ नेमे षट्काल करी पुजा । तितुकि चि स्नाने ही ओजा । न्यास ध्यान युक्त सहजा । करितसे अत्यादरे मंत्र पुष्पे ॥२५॥ सहा वेळा पुजा करी सहजा । त्या वेळा कोण कोण ओजा ।

जेणे संतोषे मी शिवराजा । निरोपु तुज आता ॥२६॥ पहिली पुजा अरुणो दयी करी । प्रहरदिन आलिया दुसरी दोन प्रहरा ती तिसरी । चौथी तिसरे प्रहरी की ॥२७॥ पांचवी सायंकाळी करी । सहावी पुजा मध्य रात्री । करावया आळस न करी । लिंग पुजेसी ॥२८॥ सहा पुजा न घडती जरी । तरि त्रिकाळ लिंग निष्ठा धरी । त्रिकाळहि न घडती तरी । तो पशू जडजीव ॥२९॥ बहू धाव एकांतावरी । एकांती लिंग अर्चा करी । भवी देखता न करी । लिंग पुजा तो ॥३०॥ लिंग पुजे वीरशैव । सदा पावती वैभव । जे का भुक्ति अभिनव । लिंग पुजा प्रभावे ॥३१॥ त्या योगे मी हि सुन्दरी । वसे वीरशैवा मंदिरी । पुजांति प्रसादाची थोरी असे जाण तेथेची ॥३२॥ शिवभक्ता घरीचे अन्न । करी अज्ञान जना पावन । ते असे सत्य शिवार्पण । अन्यार्पण नसेची ॥३३॥ जे जे असे शिवार्पित्र । ते ते जाण परम पुनित । ते सेविल्या मजसीच पावत । अनायासे तत्वता ॥३४॥ अलिंगी अथवा लिंगधारीं । जो शिवधर्माची निंदाकरी । त्याचे मुख न पाहे कांतारी । तो वीरशैव जाणावा ॥३५॥ जया वस्त्राची परवा नाही । पांघरी तरी एक घोंगडी पाही । अंगास जे वस्त्र तेही भलतैसे ॥३६॥ जोड वस्त्र लिंगाशी । जोड कैपिन लावी तैसी । मिळाले तरी घाली पायतनाशी । नित्य नेमे ॥३७॥ पायी नसुनि पादुका । न चालावे

मार्गि देखा । वाहनी आरुढावे अनेका । देश संचारा कारणे ॥३८॥ कौपिन जोडी शुद्धि करिता । हस्त पाऊड हाती धरीता । सोहं सोहळां पवित्र युक्ता । शोभे भाळी त्रिपुंड्र ॥३९॥ रुद्राक्षमाळा शोभे गळा । स्नान पुजेचिया वेळा । न देखे भविजन मेळा । त्याते भाषण न करी ॥४०॥ सहजाचे घेणे देणे । ते ही शरणावाचून न घेणे । बहुत बोलणे विनोद हसणे । न करी कदा ॥४१॥ आम्ही म्हणितले सहजी घेणे । परि सहजा तया जाणे । विधीयुक्त घेणे करणे । आचाराते मिळे तैसे ॥४२॥ चरण धरुनि तीन वेळा । कृपा करा म्हणता वेळो वेळा । तरीच घेईजे ऐसिया कळा । असत तो विरक्त मार्ग ॥४३॥ विन्हा विण कांही । घेणेची तया नाही । सोने रुपे आदि कांही । न शिवो हाती ॥४४॥ ज्ञान वैराग्य मिळे क्रियेशी । राखे तोची वीरशैव बोलिजे त्यासी । क्रिया टाकी तयासी । शिवगण न मानिती ॥४५॥ शिष्य आचार करी पूर्ण । देशिका दे योग्य भोजन । त्याते स्वयें देखोन । आनंद मानितसे ॥४६॥ ज्ञान वैराग्य क्रियेशी । राखी तो धन्ये वीरशैव वंशी । क्रिया सोडोनि चाले त्यासी । शिक्षेनें मार्गी लाविजे ॥४७॥ जो झालासे क्रिया त्याज्य । तया कोण मानील पुज्य । अधर्मे वर्तता राज्य । नष्ट होय वैभव ॥४८॥ जरी ज्ञानी पूर्ण झाला । तरी स्वधर्माचारे मान त्याला । आचार भ्रष्ट होता व्यर्थ गेला । जन्मा येऊनिया ॥४९॥ त्याने अनेक परोपकार

केली तीर्थे लहान थोरु । तैसेचि दाने अपारु । गो वाजी रथ दिले ।।५०।। तरी क्रियेविण जे पुण्य । ते सुकृतासी होय उणे । म्हणोनी न टाकिजे सज्जने । क्रियाचाराशी ।।५१।। वडिल अग्रगण्य क्रिया टाकिती । तरी नेणतेहि तैसेच वर्तती म्हणून न टाकिजे अधिक स्थिति । वाढविजे सज्जनि ।।५२।। एरव्ही क्रिया रहित ज्ञान जाणे । परि जना कारणे करणे । परोपकारार्थ वर्तणे । परि हे तो अक्रिय ।।५३।। अंधा मार्गी लाविजे । आपणहि हळूहळू चालिजे । तेवि अज्ञान अंध ओजे । लाविजे मार्गा क्रियेचिया ।।५४।। ऐसा परोपकारी परम पुरुष । पट्टाधिकारी बोलिजे तयास तोची तारक शिवाचारास। धर्मगुरु ।।५५।। आशा धरोनि बोधिना पूजा मान इच्छिना । परस्त्रीस पाहिना । कामदृष्टी कदा ।।५६।। जीव हिंसा करीना । शब्दे कोणासी दुखविना । भुवाई उचलिना कोणावरी ।।५७।। जयाचे नांव विरक्त । तो कासयासी नोव्हे लिप्त । श्वान वमन मानित । भोग विलास सर्व ते ।।५८।। तयासी लोह कांचन । गारा आणि समरत्न मान अपमान समान । आनंद भरित सर्वदा ।।५९।। तया प्रिय अप्रिय कांही । सर्वथा उरलेची नाही । निंदा स्तुति ऐकोनि । हर्ष विषाद नोव्हे मनी ।।६०।। कोणी केली जरी निंदा । हर्ष मानी तयाच्या शब्दा । मान अप-मानाचे भेदा । न जाणे विरागी तो ।।६१।। शांति दया क्षमा सुबुद्धि । अनर्थ कोणा न करी कधी । वासना तृष्णा

कुबुद्धि। कुचाळी न करी कदा ॥६२॥ नाही जाणिवेचा तोरा। नाही क्रियेचा उबारा। तो शिवयोगी खरा। वीरशैवा श्रेष्ठ की ॥६३॥ ज्ञानानळी इंद्रिय व्यापार। होमिले षड्विकार। तो आकाररुपी निराकार। शिवयोगी विदेही ॥६४॥ पातळ तेंचि गोठले। घृत कण्याकार झाले। तेवि अमूर्त मूर्तीस आले। वीरशैवरुपे ॥६५॥ काम क्रोध द्वेष मत्सर। लोभ मोह दंभ अहंकार। निंदा कुटाळी कुचेष्ठा क्रूर व्यापार। नाही शिवयोगिया ॥६६॥ सोडने बांधने न करी जंजाळ। चिंता उद्वेग नाही हळहळ। मन कल्पना रहित निर्मळ। धोतले मौतु जैसे ॥६७॥ सकळ तीर्थासी अधिपति। चरण स्पर्शे तीर्थे पावन होती। जग उद्धरावया विचरती। निष्काम बुद्धि ॥६८॥ कोठे गोडी धरोनि तोषेना। मान विधल्या फुगेना। अपमानिलिया कुंथेना। तोची वीरशैव म्हणावा ॥६९॥ मृत्यूसी कदाभिईना। मी मरेन हे घ्याईना। मी उपजलो हे आठवेना। स्वतःसिद्ध पणे ॥७०॥ मी बाळ तरुण वृद्ध। हे नाठवे तया अखंडत्व बोध। जाती कूळ गोत्र संबंध। नाठवे तया वीरशैवा ॥७१॥ जयाचा गर्भिच मंत्र पिंड। संस्कारे निपजला मार्तंड। अविद्या अनाचार हे बंड। राहेल केंवि ॥७२॥ गुरुकृपेने मांस पिंड गेला। तो संस्कारे मंत्रपिंड झाला। अविद्या अंधार दूर केला। प्रकाशला स्वप्रकाश ॥७३॥ आत्मा तरी स्वतःसिद्ध असे। तया कांही पावन

जाणता । सव्य अपसव्य ओळखता । तो होय केवि क्रिया सांडिता । विचारोनि पाहे ओ देवी ॥४८॥ भोग्या भोग्य जाणोन । जो वर्ते जाणे तो सज्ञान । अकर्तेपणे असे ज्याचे वर्तन । तो भयाने क्रिया टाकिना ॥४९॥ अकर्तेपणे असता । तो क्रिया न टाकी सर्वथा । स्वये होवोनि वस्तुता । असे म्हणोनिया ॥५०॥ यालागी अर्पितानर्पितासी । संदेह नाही तयासी । कां म्हणसी तरी फळासी । निराश म्हणोनिया ॥५१॥ का क्रिया आलियावरी । तरि फुगारा न धरी अंतरी । अथवा बिघडल्यावरी अंतरी । दुःखी न होय तो ॥५२॥ तो अवघा आपणचि झाला । तो निराश फळासी आला । म्हणोनि अर्पितानर्पित तयाला । संदेह नाही ॥५३॥ परि तो क्रिया न टाकिता नित्य वर्ते । जडजीव तरतील या परोपकारार्थे । क्रिया करावी सर्व समर्थे । जरि झाला प्रभू रूप ॥५४॥ यालागी तो सत्यशरण । क्रिया करी चित्त वृत्ति ठेवोन । क्रिया फळास निराश पण । अकर्ता म्हणोनिया ॥५५॥ ज्यासी असे ऐसे ज्ञान । तया अर्पितानर्पिती अलिप्तपण । म्हणोनि तया ठाई भेद लक्षण । धरुचि नये ॥५६॥ येणे परि जो होय अचरता । तया बोलिजे सदा सावधानता । तोचि शुद्ध प्रसादि तत्वता । सत्यशरण तो ॥५७॥

संयोगे च वियोगे च लब्धुबिंदूसुखार्पितं ॥
यः कूर्यादिष्टलिंगे च सावधाननिरंतरम् ॥६॥

संयोगी अथवा वियोगी । बिंदु मात्र जे सुख घडे अंगी । ते अर्पित जाण लिंगी । तो सावधान प्रसादी ।।५८।। ज्या ज्या क्षणी जे जे होय सुख । अणुमात्र तेहि अर्पि देख । इष्टलिंगाचेठायी निष्ठंक । तो सावधान प्रसादी ।।५९।। का म्हणसी तरि ऐक । गुरु लिंग जंगम तिन्ही एक । या- लागी लिंगासी पूजा करी नेमक । हे ते गुरुसी अर्पिजे ।।६०।। या लागी जे पूजिजे । ते गुरुसी अर्पे सहजे तैसेचि इष्टलिंगासी अर्पिजे । ते तो गुरु भोक्ता ।।६१।। ऐसिया अर्पण । विधीने जो वर्ते । सावधान प्रसादी बोलिजे त्याते । तो जीवाहूनि आवडे आमुते । सत्य शरण ओ देवी ।।६२।। जो सत्य शरण झाला । तो लिंग होवोनि ठेला । भेदाभेद निमाला । तया पुरुषाचा ।।६३।। त्याचे आम्हासी ध्यान । तो देव मी भक्त जाण । तो आत्मा मी देह आपण । ऐसा पढियंता तो आम्हा ।।६४।। तया आम्हा वियोगता । कधी न पडे तत्वता । मी तयात तो मज अतौता । होवोनि असे ।।६५।। ऐसा जो सत्यशरण । तोचि प्रसादी सदा सावधान । अंतकाळी तयाचा प्राण । वस्तुसी समरसे ।।६६।।

प्राणप्रयाणकाले च लिंगभोगोपभोगिनः ।।
अर्पयेत् सावधानेन स्वलिंगे प्राणनायकः ।।७।।

लिंग भोग भोगी जो सत्यशरण । लिंगी लिंगरूप जाहला

आपण । त्याने प्रयाण काळी सावधान । प्राण अर्पावा महालिंगा ॥६७॥ लिंग भोग घेता जो लिंगी प्राणी । त्याने प्राण प्रयाण काळी मेळओनि । महालिंगी समरसोनी । महालिंगचि होईजे ॥६८॥ ऐसा तो अंतकाळी सावधान । महालिंगी मेळवी प्राण । त्या नामे प्राणलिंगी जाण । सत्य शरण ओ देवी ॥६९॥ ना तरि जन्म वरी सावधान । अंतकाळी पडे विस्मरण । तरि केले कष्ट व्यर्थ जाण । जाले त्याचे की ॥७०॥ नरदेह पावोन उत्तम । करि सद्वर्तनाचा नेम । जो पुरुष सदा सप्रेम । शिवभक्ति करितसे ॥७१॥ तोचि या यातनेतून । दूर असे भक्त जन । त्याची निमाली सर्वथा जाण । अविद्या बंधने पैं ॥७२॥ जो आत्म अनात्म विचार करि । त्यासी प्राप्त होय मंगळेश्वरी । ऋद्धि सिद्धि परोपरी । राबती तेथे ॥७३॥ तो पुरुष शिवचि झाला । ब्रम्हीचा अधिकार त्याला । प्रति ईश्वर बोलियेला । दयाशील म्हणोनि ॥७४॥ ऐसिया दशोपत । पाप्त होती शिवभक्त । जे आचरती शिवयोग निभ्रांत । एक निष्ठ पणे ॥७५॥ देह संबंधे जी जी क्रिया घडे । ते ते सुख दुःख घेता रोकडे । न मानी आपुले कर्म साकडे । ईश्वर इच्छा भावितसे ॥७६॥ अंतकाळीचे क्लेश । निज भक्ता लागू नेदी सर्वेश । दूर करी तयाचा भवपाश । शिवभक्ति कारणे ॥७७॥ ऐसा निष्ठावंत भक्त । जो असेल गुरु करंजात । तो अहर्निश जपत । गुरुखूणेसी ॥७८॥

पूर्वी ध्यास जो होता गुरू खुणेचा। जरि अंतकाळी विसर पडे तयाचा। तरि जे आठवे तें साचा। होणे न चुके कदा ॥७९॥ गुरू खूण म्हणिजे श्री गुरुचें स्वरुप। अरुपचि असें होवोनि रुप। जैसे पातळ तेंचि गोठोन। तूप तेंचि शुभ्र जाहले ॥८०॥ उदकाची गार गोठोन। साकार झाली एक क्षण। अंति विरोन नीरपण। नव जा यकी ॥८१॥ गार विरता न विरता। नीरचि असे विवेके पाहता। तैसे गुरुरुपी निराकारता। सदा शिष्याची भावना ॥८२॥ निराकार गुरुरुपाची खूण। प्रयाण काळी जे आठवण। तरि तेंचि होईजे चैतन्य घन। परब्रम्हचि ॥८३॥ हेंहि बोल बोधावया बोलिलो देवी। तयासी आठव नव्हता काय पूर्वी। अंतकाळी आठव जाहला हे पदवी। बोलचि नव्हे ॥८४॥ तरि अखंड ध्यास पूर्वी असे। तरि अंतकाळी मुखासी ये अपैसे। आदि नसता अंतकाळी आठवू बैसे। तरि आठवे केवि ॥८५॥ ज्याचे जेथ असेल मानस। अंतकाळी तेंचि आठवे तयास। ते होणे न चुके सावकाश। ऋषी मुनी जना ॥८६॥ ज्या ज्या भावने देह जाये। त्या त्या भावने होणे आहे। हे न चुके तेंचि होय। तुझीच आण। कोणी म्हणती पार्वतीची आण। वाहिली काय म्हणोन। तरि तेंहि ऐका श्रोतेजन। खूण सांगेन जी ॥८८॥ पार्वती ते भक्त राज। भक्त म्हणिजे देव पणाचे बीज। देव पण आले भक्तांगे सहज। येऱ्हवी अव्यक्त अनाम ॥८९॥

भक्त तरि देवपणे उच्चारिती । देव तरि भक्तिने मिरविती । येरयेरा वाचून स्थिती । नुरेचि उभया ॥९०॥ भक्त भक्तिने देवो झाला । तव उभयासी भेद खंडला । आता देव भक्त म्हणणे बोल ठेला । भक्त देव एकचि ॥९१॥ या लागी देव तोचि भक्त । भक्त तोचि देव । ऐसा जरि धरी अनुभव । तरि आनेचा संदेह का धरावा चतुरी ॥९२॥ पार्वती स्त्री रूप दिसताहि । तो निजात्मचि असे पाही । विचारे आत्मा आत्मी वस्तुचे ठायी । असे काय पाहता ॥९३॥ जैसा बहुरुपी नटे सोंग । सोंग लटिके बहुरुपी अभंग । परि सोंगा वेगळे त्याचे अंग । अनेक ऐकिले काय ॥९४॥ मत्स्य कच्छ पशु पक्षी योगी स्त्री । देव नृपति अंत्यज श्वान रूपधरी । इतुकी रुपे करी खेळा भितरी । परि रुपि न मिळे बहुरुपी तो ॥९५॥ तैसा प्रभू तो एकला । अनंत रुपे तोचि नटला । तरि पार्वती आणि शिवाला । वेगळीक असे काय ॥९६॥ म्हणोनि निज प्रिती भावे । देवीची आण वाहिली देवे । हे सत्य शरण जाणती स्वभावे । अभेद पण ॥९७॥ ऐसा अभेद पणे करी पूजन । अंतकाळी असे सावधान । त्यासीच बोलिजे सावधान पुरुष जाण । सदाशिव साक्षात तो ॥९८॥

लिंगार्पिततनुप्राणमर्पितंच पृथक् पृथक् ॥
अर्पितं मुख संबंधे सुखमिंद्रियंगोचरम् ॥ ८ ॥

देह क्रिया प्राण क्रिया जे जे होत । ते ते जाणोनि महालिंगी अर्पित । अकर्ता क्रिया कर्मा अलिप्त । तो सत्य शरण जाणिजे ॥९९॥ देह प्राण क्रिया होता । तेथे सुख होय जे तत्वता। ते ते होय अर्पिता। महालिंगी जेवि॥१००॥

न कायप्राणकर्माणि प्राणलिंगांगसंगिन: ॥
कालाऽपि शरणं याति जीवन्मुक्त: स्वभाविन: ॥ ९ ॥

लिंग प्राणी जो पुरुष। कर्म बंध नाही तयास। का म्हणसी तरी सावकाश। विश्वास धरुनि ऐक पा ॥१०१॥ देह क्रिया ज्ञान क्रियेस। तो न लिंपे उभयास। अकर्ता ज्ञानी बोलिजे तयास। तोचि शुद्ध मुक्त जाण ॥१०२॥ प्राण आणि लिंग एक किजे। तयासी प्राणलिंगी बोलिजे। कालभय शरण येई सहजे। तया सत्य शरणासी ॥१०३॥

सलिंगी प्राणमुक्तश्च मनोमुक्तस्तु जंगम: ॥
प्रसादी कायमुक्तश्च त्रिविधस्तत्वं निर्णय: ॥ १० ॥

प्राण लिंगी तो प्राण मुक्त जाणिजे। जंगम तो मनोमुक्त मानिजे। प्रसादी तो शरीर मुक्त म्हणिजे। याचा निर्णय सांगु ऐक ॥१०४॥ प्राण तो लिंगी ऐक्य केला। म्हणोनि प्राण मुक्त बोलिजे त्याला। जंगम तो मनोमुक्त झाला। तेहि निरोपू तुज आता ॥१०५॥ मनाचा संकल्प विकल्प। हेंचि बंधनाचे रूप। ते मनचि झाले उन्मनी रूप। मनोमुक्त

यालागी ॥१०६॥ मनाचा संकल्प विकल्प तुटला। मनोमुक्त जंगम बोलिजे त्याला। सर्व विकारी तो सुटला। म्हणोनिया ॥१०७॥ जव संकल्प विकल्प तुटेना । तव जन्म मरण सुटेना। संकल्प गेलिया मनोमुक्त जाणा। बोलिजे जंगम ॥१०८॥ प्रसाद विश्वासे सेवितुसे। प्रसादि निष्ठे देह बुद्धि नाशे। म्हणोनि शरीर मुक्त अपैसे। तया प्रसादियाचे ॥१०९॥ ऐसी तिही प्रकारची मुक्त स्थिती। तत्व निर्णय चढे त्याचे हाती। स्वये तत्वचि होय महामूर्ति । तोचि सत्य शरण देवी ॥११०॥ तयासी लौकिक व्यवहार। नाही प्रपंच आचार। तो तारावया शिवाचार। सद्‌गुरु बोलिजे ॥१११॥

प्राणलिंगी स्वयं शांतो लौकिकाचारवर्जितः ॥
सर्व संग परित्यागी वर्तते शिवभाववान् ॥११॥

प्राणलिंगी जो पुरुष। तया लोकांचा उद्देश। लोकाचार नावडे तयास। तत्वी रत सदा तो ॥११२॥ तो तिन्ही लोक वर्जित। त्यासी नावडे स्वर्गपद पदार्थ। नावडे भोग विलास समस्त। तो तरि रत माझे ठाई ॥११३॥ त्यासी पाषाण तैसे कांचन। गारे ऐसे माणिक्य रत्न। स्त्री पुरुषा निवडण। नाही तया ॥११४॥ हा गज हा मशक। हा स्वामी हा सेवक। हा राजा हा रंक। नेणेचि निवाडा ॥११५॥ हा पापी दोषी हा साधू । हा चतुर हा मूर्ख

मैंदू । हा वैरी हा बंधू । भेद नाही तया ॥११६॥ निंदा स्तुति समधरी । मान अपमान नाठवे अंतरी । मी तू पणाची उजरी । नाही तया ॥११७॥ सर्वत्र मजलाचि देखत । जे जे देखे ते मजरुपचि मानित । अर्धक्षण मज विरहीत । न राहे तो ॥११८॥ तो न राहे मजविण एक क्षण । मी नाही अर्धक्षण त्याविण । ते माझे विश्रांतीचे स्थान । मी विश्रांती त्याची ॥११९॥ ऐसे असोनिया ज्ञान । स्वधर्मे वर्ते निष्ठे करुन । अज्ञ जना तारावया जाण । क्रिया करी नेमेसी ॥१२०॥ सर्वत्र मानिता अभेद । क्रिया भंग होय अबद्ध । असे धर्म शास्त्री प्रसिद्ध । भेद ठेवावा क्रिये लागी ॥१२१॥ अलिंगी स्पर्श होता जाण । तात्काळ करावे स्नान । क्रिया करी देह झिजऊन । तोचि धन्य संसारी ॥१२२॥ जो तिन्ही लोकाचे सुख त्यागी । कष्ट करोनि राहे शिवमार्गी । शिवयोगी रत विरागी । तो जाण निजभक्त ॥१२३॥ ऐसी ही नित्यमुक्त लक्षणे । श्री शिवकृपे पार्वती जाणे । गुरुभक्ताविणे हे जाणणे । दुर्लभ देवी सर्वथा ॥१२४॥

नाहं वसामि कैलासे न मेरौ न च मंदरे ॥
मद्भक्ता यत्र तिष्ठंति तत्र तिष्ठामि पार्वती ॥ १२ ॥

ऐक पार्वती विश्वासे । मी कैलासी तरी न वसे । मेरु शिखरी सर्वथा नसे । मी असे भक्ता जवळी ॥१२५॥

मी मंदरांचळी नाही । ढवळागिरी नसे पाही । माझे भक्त असती जे ठायी । तेथे मी वसतुसे ॥१२६॥ माझे भक्त जेथ असती । तेथ मी तिष्ठे कैलास पती । ते अखंड माझे सांगाती । मी सांगाती तयाचा ॥१२७॥ देखून भक्त वृक्षासी । मी राहे त्याचे छायेसी । ऐसी एकोपता मज त्यासी । ऐक्य भावे अभेद ॥१२८॥ या लागी बसवे-श्वरासी म्हण । तुझिया पालखातील मी तान्हे । मी श्लाघ्य तुझेनि भक्ति गुणे । भक्तिचिया प्रेमा मज ॥१२९॥ भक्ताचा मी विकला । भक्तानामी अंकिला । भक्तिभावे बांधिला । कैलासनाथ ॥१३०॥ ज्याचे हृदय निर्मळ । निष्कपट जैसे गंगाजळ । तेथ मी तिष्ठे जाश्वनीळ । सद्-भाव देखो निया ॥१३१॥

सद्भावं सद्गुणं चैव स्वधर्मं सावधानकः ॥
सत्संग स्त्वनवंद्यत्व तत्र तिष्ठामि पार्वती ॥ १३ ॥

देवी मी वसे तो ठाव ऐक । जे सद्गुणी जन सद्भाविक । दशक्रिया सुधार्मिक । तेथ मी तिष्ठ तसे ॥१३२॥ सात्विक आणि सत्यवादी । निरभिमानी सद्बुद्धि । सावधानी निरवधी । तेथे मी वसतसे सदा ॥१३३॥ शंकर म्हणे पार्वतीप्रति । जो सद्भावे अर्चि प्रेम प्रिति । तयाचे गर्भवास चुकति । स्वधर्म निष्ठे करोनिया ॥१३४॥ जे जे भाविक भक्त शुद्ध । तया कारणे न लगे बोध । ती

स्वधर्माचारे वर्तती सिद्ध । आचार ज्ञान योगे ॥१३५॥ तया जे मानिती आप्त । तया जन्मयातना न होय प्राप्त । शिवपदालागी अव्यक्त । भक्त असे तोहि पैं ॥१३६॥ व्यक्त भक्ता ओळख । लिंग भस्म धारण देख । रुद्राक्ष माळा भरणे सुरेख।शोभतसे प्राणी तो ॥१३७॥ लिंगधारण जया नाही । त्यानी पार्थीव पूजावे पाही । अथवा प्राण लिंगाचिही । पूजा करावी आदरे ॥१३८॥ लिंग धारण नाही ज्यास । जरि लिंग धारीचा घडे सहवास । तरि तो अलिंगी शुद्ध पदास । पावे शिव स्पर्शे ॥१३९॥ तैसाचि भस्माचा गुण । वीरशैवाचे भस्म पावन । अत्यादरे स्पर्श करीता जाण । तुटती जन्म फेरे ॥१४०॥ रुद्राक्ष परिधानाची गोडी । जया असे परम आवडी तोही पावे कैलास भवंडी । शिवचिन्हे करोनिया ॥१४१॥ शिवचिन्हाची थोरवी मोठी । न वर्णवे कोणा उठाउठी । धारण करिता शंकर भेटी । घडतसे निश्चये ॥१४२॥ ऐसे भक्तराज उत्तम । आचरति धरोनि नेम । तया जवळी वसे सप्रेम । अन्य स्थळ नावडे ॥१४३॥

सद्भक्तश्च सदाचार: सद्गोष्टिश्च सदा सुखी॥
सम्यक् ज्ञानं सदानंद तत्रतिष्ठामि पार्वती ॥ १४ ॥

सद्भक्त सदाचारी असती । सद्गोष्टी सदा ववती । सदा शुचित्वे वर्तंती । तेथ मी तिष्ठे सदा काळ ॥१४४॥ सम्यक्

ज्ञान सदा आनंद । सदा शांत सद्बोध । त्याचे हृदयी शिवानंद । सदा क्रीडतसे ।।१४५।। जो उदास वृत्ति सोडून । सदा आनंदी ठेवोनि मन । काल मृत्यूते विसरुन । राहे सावधान मद्भजनी ।।१४६।। जो अनिंदक अद्वैत । जो निराशः निजभरित । तयाचे हृदयी सदोदित । वास माझा असे ओ देवी ।।१४७।।

विषयान् विषवत्यक्त्वा क्रोधं पारुष्यमेवच ॥
भक्ति प्रेम दयायुक्तस्तत्र तिष्ठामि पार्वती ॥ १५ ॥

विषया विषासम मानोनि । जेणे त्यागिले तत्क्षणी । त्याचे हृदयी मी शूळपाणी । सदा निष्ठतु असे की ।।१४८।। अक्रोधी जो सदा निवांत । क्रोधाते मांग मानोनि नातळत । त्याचे हृदयी मी कैलासनाथ । अखंड असे ।।१४९।। जो निःसंग कोणाचा । संग न धरी त्रिगुणिकांचा । सुहृद असे जिवाचा । तेथ मी असे सदा ।।१५०।। भक्ति तरि प्रेमे करी । भूतदया सर्वावरी । तेथ मी त्रिपुरारि । सदा वसतसे ।।१५१।।

मद्भक्तिरतो नित्यमन्नामस्मरणं सदा ॥
शरण्योऽचार संयुक्तस्तत्र तिष्ठामि पार्वती ॥ १६ ॥

एकविध भक्ति प्रेमे करी । भूतदया युक्त जो अंतरी । तेथे असे मी त्रिपुरारी । अन्याठायी नसे कदा ।।१५२।।

वेद शास्त्रे सांगती युक्ति । जीवे करावी शिवभक्ति । तेथे कलिकालाची नसे शक्ति । महिमा अद्‌भूत भक्तिचा ॥१५३॥ माझी भक्ति कोणती म्हणसी । माझे नांव गांवे सप्रेमेशी । माझे ध्यान अहर्निशी । त्यापासी सदा वसे ॥१५४॥ नित्य नाम असे घेता । मद्रुप होय तत्वता । देखे लावी भक्तिपंथा । आचरोनि जो का ॥१५५॥ शिवकथा शिव गोष्टी । सांगता उल्हास न माये पोटी । तयापासी मी धूर्जटी । सदा तिष्ठतू असे ॥१५६॥ ते माझे अति जीव-लग । ते आत्मा मी त्याचे अंग । तया मज वियोग कदा नाही ॥१५७॥ तेणेचि केला सर्व नेम । त्यानेच्चि केला सर्व धर्म । तोचि उत्तमाचा उत्तम । जो ध्यातो सादर नाम माझे ॥१५८॥ त्या सत्यशरणाचा मी अंकित । तो चालता मी खडे वेचित । सदा मी त्या भोवता भोवत । विघ्न निवारित तयाचें ॥१५९॥ जयास तो वचन देईल । म्हणे जाय तुझे बरे होईल । तया मज देणे लागेल । तो म्हणेल तेंचि ते ॥१६०॥ सेवक जैसा स्वामी सेवेसी । सदा सादर अहर्निशी । तैसा मीहि भक्तापासी । सेवेसी सादर सदा ॥१६१॥ मी सदा वर्ते त्याचे बोली । सदा असे त्याचे जवळी । अहर्निश तयाचे मेळी । मी चंद्रमौळी भक्तिस्तव ॥१६२॥ त्याचे आम्हासी ध्यान । आम्ही हृदयी धरु त्याचे चरण । तयाचेंनि मज देवपण । तो भक्त म्हणोनि ॥१६३॥ तयाचेंनि योगे मी श्लाघ्य

त्रिनयन । तो आमुचे देवतार्चन । तयाचे सद्भावे रात्रंदिन । करी पूजन मी देवी ॥१६४॥ तो आम्हा पढियंता अत्यंत । तोचि जंगम तोचि भक्त । निराकार अकार त्या निमित्त । घेणे घडे आम्हा ॥१६५॥ आम्हा तया भेद नाही । मी तोचि तो विवेके पाही । मी त्या माजी मी त्याचे ठायी । मीच होवोनि असे तो ॥१६६॥ काशी आदि सर्वतीर्थे जाण । तयाचे चरणी होती पावन । गंगा यमुना सरस्वती मिळोन । चरण धुळी वांछिती ॥१६७॥ का म्हणसी तरि ऐक । तीर्थी पाप फेडोनि जाती लोक । त्या तीर्थांचे पापक्षाळी देख । सत्यशरणाचे चरण रज ॥१६८॥ त्याचे चरणे तीर्थे पावन । त्याचे चरण देवतासी उद्धरण । पाषाणासी येतसे देवपण । तयाचे चरण तीर्थे ॥१६९॥ ऐसे ते माझे मुकुटमणि । मी अखंड त्याचे ध्यानी । आता किती वर्णू मी वाणी । तूहि जाणसी ओ देवी ॥१७०॥ तो मज पूज्यमान जंगम । तोचि सत्यशरण जाण उत्तम । त्याच्या चरणीचे तीर्थ पावन । तिन्ही देवतासी ॥१७१॥ ही शरणाची परमगती । तुज कथिली ओ पार्वती । अभक्ताची काय स्थिती । ती परीसावी सावध ॥१७२॥ जो अभक्त खल दुर्जन । निंदी सद्भक्ताचे वचन । अवमानी धर्म नीती जाण । कुमार्गी रत सदा ॥१७३॥ धर्म नियम तोडोनि पाही । स्वमताचार रुढवी कांही । पाखंड वाढउनि लवलाही । स्वधर्माते त्यजवी तो ॥१७४॥ दुर्वासने वर्ते आपण।

तैसेचि करवी रोखून । तया वश न होता जाण । खोडमोडी दुष्टत्वें ॥१७५॥ जन्मापासून चालता धर्म । त्यागून पाळवी अधर्म । प्रसिद्ध खूण सोडुन । दुजें सांगे वर्तावया ॥१७६॥ स्वजातीची करी निंदा । त्याचे वचन न मानी कदा । यम घालुनिया आपुलिया फंदा । नेत तया यम पुरासी ॥१७७॥ तेथ त्याची घेती झडती । पाप पुण्यांची करिती गणती । जे शिक्षे लागी पात्र होती । तया ताडिती शस्त्र घाये ॥१७८॥ स्वधर्मी निष्ठा नसे ज्यासी । कुंभी पाकादि शिक्षा त्यासी । कांच रसाचे कुंडापासी । नेती त्या बुडवावया ॥१७९॥ अग्निस्तंभा भेटवून । सवेंचि करविती वृश्चिक दंशन । तीक्ष्ण शस्त्रे टाकिती छेदून । पुनर्जन्मा पाठविती ॥१८०॥ पापपुण्य होता समस्थिती । मनुष्य जन्माते घालिती । तेथे जरी स्वधर्मे वागती । नाही भीती यमाची त्या ॥१८१॥ स्वधर्मी पुण्य प्राण्यास । विनये भोगविती विलास । पुण्य क्षय झालिया निःशेष । मृत्युलोकांस पाठविती ॥१८२॥ ऐसी ही स्वधर्म पुण्याची भीती । यमादिका असे निश्चिती । पुण्यकर्माचा महिमा देव जाणती । वाखाणिती बहुसाळ ॥१८३॥ स्वधर्माचरणाचे यश । लाजवितसे शक्रास । म्हणोनि सांभाळावे तयास । स्वात्म सुखा लागी ॥१८४॥ माझे जे परम भक्त । त्याचे धर्मावर ग्रंथ । सूक्ष्म असती अत्यंत । गुरुगम्यते ॥१८५॥ जे मज आठविती रात्रंदिन । मज अर्चिती पंचाक्षरे करोन ।

ते मज प्रिय अनुदिन । लिंगधारी ॥१८६॥ तया शिवभक्ता यम येत शरण । जे का लिंगधारी करीती भस्म धारण । तैसेचि घालिती रुद्राक्षाभरण । ते पावन ब्रम्हादिका ॥१८७॥ तेथे मी अहोरात्र वसे । भूतगणासह परियेसे । अष्टमहासिद्धि सावकाशे । राबती तेथे ॥१८८॥ न आवडे कैलासवास । कैलासी मी असे उदास । भक्त गृही संतोष वश । जुलतसे आनंदे॥१८९॥ऐसा सदाचारी तोचि जंगम । माझेचि स्वरुप जाण सुगम । त्याविण मज नसे प्रेम । अन्याठायी ॥१९०॥

> मद्देहं जंगमं देहं मत्प्राणश्चरलिंगकः ॥
> तस्माद्धिचरतीर्थेन मम तृप्तिर्वरानने ॥१७॥

माझा देह तव जंगम देह । माझा प्राण तो जंगम आहे । पाहता विचारे पाहे । पूज्यमान तो आम्हा ॥१९१॥ या लागी चरणतीर्थ आम्हासी । सेवावया अधिकार नेमेसी । त्याचे तीर्थ तृप्ती आम्हासी । निजमानसी ओ देवी ॥१९२॥

> अनादि जंगमं देवि संपूज्य चरणोदकं ॥
> अर्पयेत्परया भक्त्या ब्रम्हाविष्णूसुरेश्वरान् ॥ १८ ॥

अनादि सिद्ध जंगममूर्ती । निराकार तारावया भक्ताप्रति । अवतरला सत्यशरण जाणती । सत्यशरणाला ॥१९३॥ त्याच्या चरणीचे तीर्थ । आम्हा तिन्ही देवासि

अर्पित । करावया अधिकार नेमस्त । असे वो पार्वती ॥१९४॥ त्याचे चरण प्रक्षाळून । अष्टविधार्चने कीजे पूजन । अंगुष्ट तीर्थाचे सेवन । आदरे कीजे ॥१९५॥

अनादि जंगमो नित्यो निजैवास्य चराचरं ॥
चातुर्वर्णं भवेत् शिष्यं जंगमो गुरुरुच्यते ॥१९॥

अनादि सिद्ध जंगम जाण । नित्य निर्गुण निरंजन । तो चातुर्वर्णासी गुरु आपण । तारक जाणिजे ॥१९६॥ या– लागी तोचि गुरुराव । त्याची दीक्षा घेवोनि एकभाव । तो त्यजुनि करी अन्य गुरुदेव । तरि निरयासी जाईजे ॥१९७॥ बहूलिग बहू दैवत पूजन । बहु प्रसादी बहुगुरु सेवन । तयासी दृष्टांत जो देईन । तो ऐक ओ देवी ॥१९८॥ जैसा दासी कुसी पुत्र झाला । तो आप्पा म्हणेल भलत्याला । ऐसा विचार घडला त्याला । ज्याला गुरु बहू होती ॥१९९॥ एक निष्ठा एक भावो । तोचि होय देवाधिदेवो । परि अधिच जाणोनि गुरुरावो । ज्ञानिया कीजे ॥२००॥ जो असे ज्ञानांकित । जयाची संतमुखी स्तुत । त्याची दीक्षा निभ्रांत । घेईजे विशेषे ॥२०१॥ ऐसा जो गुरुरूप जंगम । मीच तो जाण उत्तम । ज्याचे पूजे चा आम्हा नेम । ते विश्राम धाम आमुचे ॥२०२॥ इति श्रीपरमरहस्य सारामृत । शिवगौरी संवादी वर्तत । त्याची टीका करोनि प्राकृत । कृत कृत्य मन्मथ ॥२०३॥

इति श्रीपरमरहस्ये हरगौरी संवादे शरणलक्षण निरोपणे नाम पंचोदशोऽध्याय संपूर्णं : ओव्या २०३ श्लोक १९

## अध्याय १६ वा

श्रीगुरु परब्रम्हणे नमः । पंचदशमोध्यायपर्यंत । कथीले रहस्य अमित । ऐकूनसद्गदीत झालेंचित्त । पार्वतीम्हणे शिवाप्रती ॥१॥ शिवाचार धर्मांची प्रसिद्धि । कवण्या-आचार्यानें केलीवृद्धि । तो प्राप्त नामें मजनिवेदी । कृपा करुनि स्वामिया ॥२॥

अतः परंप्रवक्ष्यामि पंचाचार्यं समुम्द्वः।
तेषांनामानि देवीत्वं श्रुणूनिश्चल मानसा ॥१॥

शंकरम्हणे । देवीप्रती । तुझाप्रश्न आचार्यउत्पत्ती । श्रवणतत्पर शुद्धचित्तीं । सादरजाण असावें ॥३॥ आदीसांगेन आचार्याचेंनाम । पुढें कथीलें आवतारग्राम । स्वयंभवागमीं विस्तार नेम। असे जाण पार्वती ॥४॥

एकोरामः पंडितार्यस्तथा रेवणसिद्धराट् ।
तथामरुळ सिद्धेशो विश्वाराध्या इतिक्रमात् ॥ २ ॥

एकोराम आणि पंडितार्य । हे अवतार भूवरी गुरुवर्य । वीरशैवधर्मीं सर्वकार्यें । आज्ञेप्रमाण घडतसे ॥५॥ रेवणसिद्ध प्रसिद्ध गुरु । जेणेंकथीलासें शास्त्राचारु । वीरशैव धर्माचा विस्तारु । सिद्धांत दाखविला पैं ॥६॥ मरुळसिद्ध नामेसाचार । प्रगटले माझेंनामधार । तेणेंकेला

जगउद्धार । भक्तिज्ञान जाणेंतो ॥७॥ विश्वाराध्य महागुरु । सर्वातश्रेष्ठ अधिकारु । गुरुत्वाचा विचारु । प्रगटकरी वेळोवेळा ॥८॥

एकोरामस्य जननं मावासस्तु हिमालये ।
द्राक्षारामे रामनाथे लिंगेयुग चतुष्कये ॥३॥
सुधाकुंडाख्य सुक्षत्रे लिंगे श्री मल्लिकार्जुने ।
जननंपंडितार्यस्य निवासश्रीगिरौशिवे ॥४॥
तथा रेवणसिद्धस्य कोल्लिपाके पुरोत्तमे ।
सोमेशलिंगेजननं मावसः कदली पूरे ॥५॥
तद्वन्मरुळसिद्धस्य वटक्षेत्रे महत्तरे ।
सिद्धेशलिंगे जननं स्थानमुज्जयिनिपूरे ॥६॥
काशांविश्वेश्वरेलिंगे विश्वाराध्यस्य संभवः ।
स्थानं श्रीकाशिकाक्षेत्रे श्रुणू पार्वती सादरं ॥७॥
कृतायुगचतुष्केते पंचाराध्य यथाविधिः ।
ममपंचमुखोभ्दूता संस्थाप्य लकशान्भुवि ॥८॥

एकोरामाचें अवतारस्थान । हिमालयीं प्रसिद्ध रुद्राक्षवन । रामनाथनामे लिंगामधून । उत्पन्नझाले प्रथमयुगीं ॥९॥ पंडितार्य प्रगटस्थान सुधाकुंडनामें क्षेत्रजाण । मल्लिकार्जून लिंगांतून । पीठस्थ राहे श्रीशैलीं ॥१०॥ वीरधर्म प्रतिपाळक प्रसिद्ध।अवतरले सत्य रेवणसिद्ध। कोल्लीपाकनगरा भितरींशुद्ध। सोमेशलिंगीं उभ्दवले ॥११॥ तेथून निघाले सत्वरवना । गुरुत्वाधिकारचें ज्ञाना । जाणेंसर्व व्यक्तिच्या खुणा । उपदेशी शैवधर्माते ॥१२॥ त्यांनीं आपलेंतें सिव्हासन । रंभापूर येथें स्थापून वीरशैवधर्मा

प्रगटून । शिक्षाकरी धर्मभ्रष्टा ॥१३॥ वटक्षेत्रीं अवतार होता । चरणीं पावनझाली माता । उद्धव सिद्धेश लिंगींत-त्वता । सिंव्हासन उज्जयनि येथें ॥१४॥ तेची मरुळाचार्य विख्यात । शिवआज्ञेने मृत्युलोकांत । वीरशैवधर्मा संरक्षीत। महाज्ञानी जाण तो ॥१५॥ विश्वेश्वर आराध्य गुरु । काशीका क्षेत्री पिठाचारु । विश्वेश्वरलिंगीं संजारु । अज्ञ-जना कारणें ॥१६॥ पार्वती प्रश्न करी शिवाप्रती । हे आचार्य अवतार सांगा किती । युगसंख्या कोणते धर्मस्थिती। कैसी अ़से चरा चरी ॥१७॥

यदायदाप्राण शिवैक्यभाजां ह्यनिर्भवेन् भूमितले गणेशा : ।
तदातदार्य मर्त्यकुलेवतीर्यं स्वयंभूकुर्वतिह्वि धर्मसंस्था ॥ ९ ॥

शंकरसांगे आंबेऐक । माझे पांच जे गणनायक । महापरा-क्रमी रेणुक । वीरशैव धर्ममूर्ती ॥१८॥ तयाचे परी दारुकजाण । धर्मरक्षणासाठी निर्माण । होता तात्काळ नलगे क्षण । प्रतिसृष्टि कर्ते जे ॥१९॥ ऐसे हे एका मागून एक । अवतीर्य कैलासनायक । वीरशैवधर्म प्रतिपालक । शिक्षा देत धर्मभ्रष्टा ॥२०॥ ज्याकाळी लिंगाईत धर्महानी। त्याकाली सर्वधर्म लया जाऊनी । अधर्मवाढे सतत मेदिनी। धर्मविचार नसे क़ोणा ॥२१॥ स्वधर्म सांडोनिया जाण । करीती अधर्म मंडण । तेणे पुण्यक्षय होऊन । दरिद्रता प्राप्तहोये ॥२२॥ अधर्म जाहालिया सृष्टी । कवा नोहे

पर्जन्यवृष्टी । तेव्हां कैलाशी येऊन परमेष्ठी । प्रार्थितसे शिवालागी ।।२३।। म्हणे अधर्म वाढला महिवरी । प्रजा-जर्जर सर्व निरहारी । तयाचे संकट त्वरित निवारी । कृपादृष्टी करुनिया ।।२४।। तेव्हां शिवआज्ञा करी गणाशी। तुम्ही त्वरें जावें मृत्युलोकाशी । सर्वधर्म चालते ज्याचे त्यासी । कीजे सत्य यावेळीं ।।२५।। वीरशैवधर्म परमपा-वन । तयाचीवृद्धि करिता जाण । दुजेधर्म वाढावया कारण । हेचीमुख्य साधन पै ।।२६।। रेवणसिद्ध पूर्व दिशे। दक्षिणे मरुळसिद्ध असे । पश्चिम दिशी वसे । एकोराम।२७। पंडिताराध्य उत्तपेसी । विश्वाराध्य तो मध्यप्रदेशी । शंकर निरोपि पार्वतीसी । हे चहुयुगी जाहले ।।२८।।

प्रत्येकं च प्रवक्ष्यामि प्रतिनामानिच श्रुणु ।<br>
प्रवरोवीरशैवेति अतिवर्णश्चवर्णकः ।। १० ।।<br>
सद्योजात मुखोत्पन्नो रेणुकः परिकीर्तितः ।<br>
तन्नामरेवणसिद्धं सूत्रं पडविडीत्यपि ।। ११ ।।<br>
वीरशैवेंति प्रवरो ह्यातिवर्णश्चवर्णकः ।<br>
कमंडलुश्च रजतः अश्वत्योदंडईरतः ।। १२ ।।<br>
राजतः कलशतश्यच सद्योजातमुखं ।<br>
तस्यस्वेतमयी कंथालक्षणं वीरगोत्रीणां ।। १६ ।।

शंकर म्हणे देविप्रति । जी परशिवाची मुखे पांच। सद्योजात वामदेव अघोर साच। सत्पुरुष ईशान त्यातच। उद्भवले आचार्य गण।।२९।। सद्योजात पूर्व मुखापासून निर्धारु। रेव-

णसिद्ध योगेश्वरु । प्रगट झाले भूलोकीं ॥३०॥ पडविड सूत्र जयाचे । एकाक्षर प्रवर साचे । मंत्रमुखी बीज घोषाचे । उच्चार जाण होत असे ॥३१॥ कलश रौप्याचा लखलखीत । हस्ताचे ठायी दंड अश्वत्थ । प्रवराची कीर्ति विराजीत । सत्यधर्म जाण तो ॥३२॥ ऐसा हा वीरशैव पुत्र । तयाचे असे वीरगोत्र । मंत्र जप अहोरात्र । वदतसे वदनीं पै ॥३३॥ हाची होय प्रथमाचार्य । सर्व जगी हा होय आर्य । लिंगधारीचे गुरुवर्यं । असे जाण देवी पै ॥३४॥

वामदेव मुखोत्पन्नो दारुकः परिकीर्तितः ।
तन्नाममरुळाराध्य तस्य सूत्रं च वृष्टिकम् ॥ १४ ॥
तस्य दंडश्च पालाशो तथा ताम्र कमंडलुः ।
म कारो मंत्र बीजं च शाखा दारुकईरितः ॥ १५ ॥
कलशतस्य ताम्रश्च वामदेवमुखं तथा ।
तस्य कंथा च मांजिष्ठा लक्षणं नंदी गोत्रिणां ॥ १६ ॥

शिवम्हणे गिरीजासुंदरी । माझे वामदेव मुखा भितरी । मरुळाराध्य ते अवधारी । एकाएकी अवतरले ॥३५॥ तेची हे मरुळसिद्ध नामधार । वृष्टि सूत्रीक वीरशैव प्रवर । चहुवर्णा हूनी श्रेष्टतर । अतिवर्ण जाणावा ॥३६॥ तयाचा ताम्र असे कलश । सुदृढ दंड ज्याचा पालाश । मंत्रबीज उच्चार विशेष । गोत्र नंदी असे पै ॥३७॥ शाखा तयाची म्हणसी कोण । तरी ती दारुक जाण । कमंडलु मेखला शोभायमान । कांती प्रकाशे अवनीवरी ॥३८॥ तपोतेज मंत्राधिक ।

महामुनि वंदिती देख। कटी कौपिन यशदायक। कालाशासन करी नेमें ॥३९॥ या लक्षणे करुनयुक्त भस्म रुद्राक्ष सुशोभीत। लिंग सज्जीका विलसत हृदयावरी तयाच्या ॥

मदघोरमुखोत्पन्नः शंकुकर्णोति नामतः।
एकोरामेति तन्नाम तस्य सूत्रंच लंबकं ॥ १७ ॥
प्रवरो वीरशैवेति अतिवर्णश्च वर्णकः।
वेणुदंडस्तु स्तस्यास्ति तथा लोहं कमंडलुः ॥ १८ ॥
शिकारो बीजमंत्रश्च अति वर्णाश्रमे रतः ॥
शाखा शंकुकर्णाख्या लक्षणं भृंगि गोत्रिणाम् ॥ १९ ॥

शिव म्हणे गिरीजा सुंदरी। अघोरमुखा भितरी। शंकुकर्ण ते अवधारी। आचार्य वर अवतरले ॥४१॥ तयाचे नाम एकोराम। सर्व जीवाचे विश्राम धाम। लंबक सूत्राधिकारी परम। गोत्र भृंगी जयाचे ॥४२॥ वेणू दंड परीकर करी। काळा शिक्षा भोडनधरी। वीरधर्माचा कैवारी। धर्मरक्षक जाणतो ॥४३॥ मंत्र शक्ति वसे जिव्हाग्री। नासाग्री ध्यान तो धरी। लोह खापरी धारण करी। कलश तो हि लोहमय ॥४४॥ शिकार मंत्र बीजाक्षर। अखंड ध्यानी निरंतर। सदा तन्मय मुनीश्वर। एकोराम तो ॥४५॥

तत्पुरुषमुखोत्पन्नो धेनुकर्णेति नामतः ॥
तस्यनाम पंडितार्यं स्तत्सूत्रं मौक्तगुच्छकं ॥ २० ॥
प्रवरोवीरशैवेति अतिवर्णश्च वर्णकः ॥
न्योग्रोधस्तस्य दंडःऽस्ति कास्यं तस्यकमंडलु : ॥ २१ ॥

वकारो मंत्र बीजं च श्रुतिश्चाथर्वणी शुभाः ।
श्वेत कंथा तु संप्रोक्ता लक्षणं वृषभगोत्रिणां ॥ २२ ॥

तत्पुरुष मुखापासून । उत्पन्न झाले पंचानन । जया नाम धेनुकर्ण । पंडितार्य बोलती त्या ॥४६॥ मुक्तगुच्छसूत्राचा अधिपति । महासूत्र जया वंदिती । उपसूत्रे द्वादश शोभति । तयाआचार्या जाणावे ॥४७॥ प्रवर असे तयाचा चतुर्थ । धर्मज्ञासच कळे अर्थ । शिवानंदकास शिक्षा यथार्थ । करी नेमे जाणतो ॥४८॥ वर्ण जयाचा असे श्रेष्ट । न मानि-कोणाचे मत वरीष्ट । वीरशैवधर्मालागी बलिष्ट । न्योग्रोध दंड धरीयला ॥४९॥ कांस्य कमंडलु सुरस । चतुर्थं अक्षरी विशेष । मंत्रबीज महातेजस । सदाजपे मुखामाजी ॥५०॥ जयाची शाखा धेनुकर्ण । कलशअसे शुभ्रवर्ण । करी सदा भस्मचर्चन । बिल्वपूजा इष्टलिंगा ॥५१॥ येणेपरी लक्षणयुक्त । वृषभगोत्र जयाशोभत । सर्वदेवाहून प्रभूत । असे जाण वरानने ॥५२॥

ईशानाख्य मुखोत्पन्नो विश्वकर्णेति विश्रुतः ।
विश्वाराध्यश्च तन्नामतत्सूत्रं पंचवर्णकं ॥ २३ ॥
वीरशैवेति प्रवरो ह्यतिवर्णश्चवर्णकः ॥
दंडोबिल्वइतिप्राक्तः सौवर्णश्च कमंडलुः ॥ २४ ॥
यकार मंत्रबीजंच विश्वकर्ण शक स्मृतः ॥
कलशस्तस्य सौवर्णो मुखमीशानमीरितं ॥ २५ ॥
तस्य कंथापीतवर्णा लक्षणंस्कंद गोत्रिणां ॥

एतेषांपंचगोत्राणि भिन्न भिन्नानि नसंशय: ॥२६॥
एकैकस्यच गौत्रस्य शाखासूत्रादिकं पृथक् ॥
यस्यगोत्रस्य याशाखा यत्सूत्रं प्रवरादिकं ॥२७॥

साझे ईशानमुखापासून । तो विश्वकर्ण आचार्य जाण । अवतार गुरुसमर्थ पूर्ण । दंडशिक्षा करावया ॥५३॥ तयाचे सूत्र पंचवर्ण । विरशैवप्रवरोप्तन्न । सर्वाचाधिगुरुत्व संपूर्ण । असे जाण विश्वार्या ॥५४॥ मंत्रबीज जयाचा नेम । हाती बिल्वदंडसुगम । कलशा धातु असे हेम । वस्त्रजाण पीतची ॥५५॥ शाखा ज्याची विश्वकर्ण । कमंडलुचाही वर्ण । स्कंद गोत्र अग्रगण्य । श्रेष्ठासन जयाचे ॥५६॥ ईश्वर म्हणे पार्वतिप्रति । हे आचार्य अवतार मागुती । सूत्रे प्रगटली अभ्दूतरिति । वेगळाली वीरशैवा ॥५७॥ ऐसे हे पचाचार्यांची स्थाने । तुज निरोपिली वरानने । माहेश्वर जंगमाचें मूळस्थान । वीरशैवाचे मुख्यगुरु ॥५८॥ चहुयुगी आचार्य झाले । वीरशैवधर्माप्रति पाळीले । सातशेसत्तरगण निवडीले । धर्मरक्षणा कारणें ॥५९॥ गणअनंत असती । शिवगणाची महाशक्ति । रुद्रगण अमर असती । वर्णावया शक्ति नोहे ॥६०॥ एकाचौकडिचे गणाजरी गणती गणले जाणापरीअनंत चौकड्याचीखूण । सांगतो ऐकपां ॥६१॥ कृत त्रेत आणि द्वापार । कली-युगासहित चार । ही एकचौकडी साचार । होतसे गणावया ॥६२॥ ऐशा चौकड्या एकसहस्त्र होती । तव

अस्तमान जाय गभस्ती । तैशा सहस्त्र चौकड्याजाती । तव एक दिवस ब्रम्हयासी ॥६३॥ ऐसे तीस दिवस जाती । तव एक मास होय विधात्याप्रति । ऐसे व्दादशमास होती । तयीं एक वर्ष होय ॥६४॥ ऐशी वर्षे जाती एकशत । तव ब्रम्हयासी होय अंत । त्याचे अयुष्याचे सरेगणित । तेव्हां एक घटिका विष्णुची।६५।ऐशा घटिका साठ जाती । तव एक दिन होय विष्णुप्रती । ऐसे तीस दिवस होती । तयी मास एक विष्णुचा ॥६६॥ ऐसे मास द्वादशहोती । तयी एक वर्ष विष्णुप्रती । ऐशीवर्षशत जाती । तेव्हां विष्णु एकहोय ॥६७॥ ऐसे विष्णु द्वादश होती । तयीं अर्धपल रुद्राप्रति । त्यारुद्राचे गण सांगुकिती । केवि गणवेल पै ॥६८॥ ऐसे युगायुगीचे गण । सांगे ऐसा आहे कोण । म्हणूनि संक्षेपे मात्रे प्रमाण । सातशेंसत्तर असती ॥६९॥ यावेगळे सप्तकोटी । तेअसती कैलासकपाटी । तयाचीनामें सांगता-निकटी । ध्वनिनपूरे वर्णावया ॥७०॥ ऐसी शिवाचार दीक्षाजाण । पंचाचार्य युगायुगी निर्माण । शिवाचारा प्रतिस्थापून । भक्तिजना लाविती ॥७१॥ इति श्री परमरहस्य सारअमृत । टीका करूनिप्राकृत । कृतकृत्य मन्मथ । षोडशोध्याय: संपूर्णमस्तु ॥७२॥

इति श्री परमरहस्ये शिवगौरी संवादे आचार्यावतार मठलक्ष-
णादि कथनम् नाम षोडशोध्यायः ओव्या ७२ श्लोक २७



## अध्याय १७ वा

श्रीगुरु परब्रम्हणे नमः । श्रीपरमरहस्य ग्रंथसुंदर । षोडशो-ध्याय पर्यंतसार । वीरशैव धर्माचे प्रकार । वर्णिलेशे बहुविध ॥१॥ आतां सुरस पवित्रविधि । जाग्रत लिंग मंत्रसिद्धि । दीक्षासंस्कार विवाह् आधि । योग्य जाण वीरशैवा ॥२॥ तया संस्काराची संधी । कोण्याकाली सांगा आवी । लिंगधारी पूजाविधि । जेणे सफल होतसे ॥३॥

ई. उ. गर्भाष्टमे कृतामुख्या दीक्षासा षोडशाब्रिधिः ।
गौण तदुर्ध्वं मधमा दीक्षावीरान्ववायिनां ॥१॥

ईश्वर म्हणे आंबे प्रती । तुझ्या प्रश्ने जगोद्धरती । तेची मी आनंदप्रिती श्रुत केले असेपै ॥४॥ जन्म झाल्या पासून जाण । लिंगदेहाची आठवण । तीच दृढ सुपरि-पूर्ण । येणें संस्कार होत असे ॥५॥ जन्मापासून आठवे वर्षी । दीक्षाकाल उत्तम असे । मध्यम जाण षोडषवर्षे । तयापुढे

गौणपै ।।६६ दीक्षेलागी आचार्य आवाहान । आदि करावे न्यासध्यान । संकल्पे प्रोक्षूणी पूजाविधान । आचार्या-आसन द्यावेपै ।।७।। मूर्तीमंत गुरु । तया करूनि अतिआदरु । शरणशिष्याचा अंगीकारु । दीक्षेलागी पार्थावे ।।८।। देशीक आसनी नसता । आरंभू नये कार्य सर्वथा । नमस्कारून तत्वता । रुद्राक्षाभरण भस्मशोभे ।।९।। आचार्यकलश जलेकरून । प्रणवबीजांकित पूर्ण । पंचपल्लवतळी धान्ये । शास्त्रविधि वीरशैवे ।।१०।। दीक्षा-परित्वे कलशचार । पूर्वपश्चिम आणिउत्तर । दक्षिण—चवथी सत्वर । स्थाने जाण देवी पै ।।११।। मध्यकलश पांचवा पूर्ण । प्रणवरूपी गुरुजाण । कार्यायोजी मुख्यासन । यथाविधि तयाप्रती ।।१२।। मगकरावे पूजन । षोडशो-पचारे जाण । जेणे गुरु सुप्रसन्न । होतसे मोक्षदेता ।।१३।। तयोगुरु प्रेमेकरून । भस्मधारणेकरी पावन । निद्रस्थ-लिंगा चैतन्य । प्राप्त करी तयेवेळा ।।१४।। प्रतिष्ठाप्राण संजीवनी । चरदीक्षा लिंगालागुनी । स्वकरे शिष्य हस्ते देवूनी । मस्तकी हस्त ठेवी ।।१५।। तयी झाला गुरु करं-जात । गुरुपुत्राचे मालिकेत । प्रसिद्ध योगइंद्रियजीत । महामंत्र गृहण करी ।।१६।। तयाचे पुण्य पुरश्चरण । संख्या-चारलक्ष जाण । तितकेची जंगमभोजन । सिद्धिस्तव आचरावे ।।१७।। गुरुमंत्र ऐकूनकर्णी । सद्गतपावे जाची

वाणी । स्वधर्मीनिष्टा पूर्वज दोन्ही । उद्धरती निःसंशय । ॥१८॥ जया पंचकलशी दीक्षा नाही । तया भवी बोलती-पाही । तो शिवभक्तचि नोव्हेदेही । अन्यदेही जाणावा ॥१९॥ तीर्थप्रसाद तत्वता । देवू नयेची सर्वथा । लिंगांगी दीक्षा नसता । भवीतया बोलीजे ॥२०॥ जया तीर्थप्रसाद नाही।तो वरीवरी भक्ति दावीकाही।कंठीचा इष्ठलिंग तोही। पाषाणवत् जाणीजे ॥२१॥ तीर्था लिंगाचे असे जीवन तयाविणे लिंग निर्जीव जाण । न मीळे प्रसादपत्रीपूजन । तो निर्जीवलिंग जाणीजे । कोणी म्हणती जे लिंग बांधिले । तयीच तीर्थप्रसाद अर्पिले । आता प्रतिदिनी काय घेतले । क्रिया चालवावया ॥२३॥ तरी तैसे नाही देख । जेयी-वृक्ष लाविले अनेक । तयेवेळीच तया उदक । घातले वारंवार कायसा ॥२४॥ नित्यमंत्रोदक लिंगावाहून । पवित्रपणे करावे सेवन । गुरुपादोदकमंत्रासमान । जाणूनिया प्राशावे ॥२५॥

पत्रंपुष्पंफलंतोयं मन्नापानाद्यमौषधं ॥
लिंगार्पितंविर्नीभुक्ते भुक्तेसद्योहिकिलबिशं ॥२॥

लिंगधारी इष्ट धर्म पहाता । फलपत्राते ग्रहणकरिता । पुष्प अन्न आणि औषध लता । लिंगार्पित करावी ॥२६॥ लिगार्पितविणे वस्तु । कधी करू नये ग्रस्तु । न स्पर्श भस्म मंत्रातू । पातक घडे तयाप्रती ॥२७॥

ऐसा हा प्रसिद्धधर्मं। लिंगधारी जाणती वर्मं। आचाराचा करी प्रेम। तेची ज्ञानी जाणावे ॥२८॥ दीक्षागुरु सांगे-आचारवर्मं। तेची आचरावे स्वधर्मं। इतर गुरु बोधि-ती कर्मं। ते वीरशैवा नसे पै ॥२९॥ येरे गुरु घरोघरी आसती।स्वार्थअर्थ बोधि शिष्याप्रति।तयाचे सार्थक न जाण-ती। नर्कि घालिती कुमार्गे ॥३० नाना मतांतर दाविती तीर्थाटणा पाठविती। कोणी पाषाण पूजविती। नानारुपी देवते ॥३१॥ एक तपाशी पाठविती। एक धूम्रपान कर-विती। एक पंचाग्नि साधविती। संसारसुखा त्यागूनी ॥३२॥ कोणी लोकिककर्म दाखविती। कोणी वायू आहार-घेवविती। कोणी आसनि बैसविती। एक होती मौनधारी ॥३३॥ एक नग्नची ते पळती। एक स्त्रीयाते टाकविती। एक इच्छाअन्न त्यागिती। कष्टे भक्षती कंदमुळे ॥३४॥ एकते कपाटी बैसती। एक बोडकेची आसती। एकउर्ध्व बाहू उभारिती। मस्तकीं जटा वाढवून ॥३५॥ एकते-जपे गोविती। एकते समाधि लाविती एकते तिमिरा प्रतिभासती। अखंड डुल्लती जाणपै ॥३६॥ एकनासिको लक्ष लाववितो। एकनेत्र विकाशीत ठेविती। एकनयना-प्रती झाकविती। अंतरी पहा म्हणूनी ॥३७॥ एक देव-तांतरे भेटविती। एक हठ्योग जाणविती। जलासनी बैसविती दुख:दायक साधनी ॥३८॥ एक ऐसा उपदेश

करती। आत्मज्ञानाते वर्णिती। चैतन्य साधन इच्छिती। दुःख पावती न साधता ॥३९॥ ऐशी नानासाधने साधविता। गुरुवचनी विश्वास नसता। सर्वसाधने निर्फळ तत्वता। होती जाण अनायासे ॥४०॥ म्हणून सद्गुरुसी जावे शरण। स्वधर्मनीतीचे विवरण। करून असावे आचार पूर्ण। तरीच सर्व साध्य होते ॥४१॥ जे जे करावे आचरण। ते ते शिवार्पित करून। लिंगनिष्टे गुरुशव न। करूनवर्ते जगीधन्य ॥४२॥ तो सकल क्रियेशी कर्ता। निष्काम बुद्धि-रहिता। अष्टमहासिद्धि पायी लागता। श्लाघ्यता न इच्छि ॥४३॥ तया त्रिभुवनीचे राज्य देता थुंकून टाकी सर्वथा। इंद्रपदाप्रती हाणी लाथा। निमग्न राहे ब्रम्हरूपी ॥४४॥ जो अमृतपान करीत असे। तो काजी अपेक्षा न धरीतसे। जो विवेक सुख भोगीतसे। तो निमग्न ब्रम्हरूपी ॥४५॥ जो परब्रम्हमूर्ती शुद्ध जंगम। तयावर्णिती वेदागम। परा-त्पर सुखाचे धाम। तयादर्शने प्राप्तहोय ॥४६॥ जेथे-मुक्ति दास्य करी निरंतर। प्रसन्न झाल्या भक्ता दे सत्वर। आपले पद अधिकार। न पाहे मागेपुढे ॥४७॥ तो भावाचा भोक्ता। सद्भावे शरणजाता। जन्मजन्मांतरीची व्यथा। सर्वही हरतसे ॥४८॥ तोची कृपेचा असे सागर। त्याची कृपा आम्हा निरंतर। शिवत्वाची पदवी थोर। प्राप्तहोय तया योगे ॥४९॥ शिव म्हणें गिरजेप्रति। माझे अंश जंगम-

मूर्ती देवादिक सदा वंदिती । रूप माझे म्हणूनिया ॥५०॥ शिवपार्वती संवाद । वीरशैव आचारभेद । वर्णिलाअसे नानाविध । त्याचे सार कथीलेसे ॥५१॥ ऐसे पार्वती ऐकून वचन । तद्रूप झाली आनंदघन । तन्मय होऊननिया उन्मन तटस्थ झाली जगदंबा ॥५२॥ सावध होऊन पार्वती । नमस्कार करी शिवाप्रती । म्हणे मज कळली वीरभक्ती । आचारनीति सूक्ष्म जी ॥५३॥ महापुरी वाहात जाता । अकस्मात भेटे जीवदाता । तैसे मज स्वामी समर्था । भ्रमातून काढीले ॥५४॥ चरणालागे वेळोवेळा । अज्ञान-जनाचिये डोळा । धन्य धन्य जाश्वनीळा । सुनीति दाखविली ॥५५॥ जेअसती वीरभक्त । जेआचार दीक्षा-वंत । जे झाले गुरुकरंजात । तेही ग्रंथ परिसावा ॥५६॥ भवीसी श्रवण न करवावा । वीरशैवा सदा ऐकवावा । ऐकून हृदयी धरावा । तैसाची करावा आचारु ॥५७॥ असो आता कथन फार । परमरहस्य ग्रंथ सविस्तार । पार्वती-प्रती ईश्वर । सांगतसे वारंवार ॥५८॥ त्याचे सार ह्या ग्रंथाचे ठायी । वर्णिले असे सत्राध्यायी । अज्ञजना आचाराविषयी । आरसा जाण पहावया ॥५९॥ हा ग्रंथ-स्वये ईश्वरमुखीचा । तोचीआवतार नागेशसाचा वीरशैवधर्म पाळावयाचा । प्रगट करविणार पै ॥६०॥ तयाचें नामाभिधान । नागेश गुरु म्हणऊन प्रगटकेले

गुह्यज्ञान । लिंगधारी कळावया ॥६१॥ यालागी शिवतोचीहा नागेश्वरु। परंपरेची बसवराजश्रीगुरु। मानूरपट सिंव्हासनाधिकारु। असेजाण जयाशी ॥६२॥ तयाचे कृपे करूनिया जाण। परमरहस्य टीका विस्तारून। बसवराज करवीत आपण मतिहिनाकडून पैं ॥६३॥ हा असे प्रसादी ग्रंथजाण। याचे करी जो नित्य पारायण। तयाची भवव्याधी चुके मरण। अमर होय सत्यपै ॥६४॥ ज्याचा नाही लिंगी विश्वास। जे अन्य धर्माचे बनले दास। त्याचा स्पर्श न करावा या ग्रंथास। अधर्मी जाण म्हणूनिया ॥६५॥ जे विश्वासे भावे वाचिती। ते संसारसुख भोगिती। अंती पावे सायुज्यमुक्ती। धन्यनर तेचीपैं ॥६६॥ जयाचे जैसे ये संकट। तेते वारी नीलकंठ। ग्रंथी विश्वास एकनिष्ट। तरीच फल होय तया ॥६७॥ जे दुर्जन निंदक खळ। तयानावडे ग्रंथरसाळ। रंभा फळत्यागून अर्किफळ। आवडीजाण वेचीतसे ॥६८॥ की दुग्ध सांडूनिया जाण। प्राशी मद्याते जाऊन। किं दुर्दैवे नेत्र बांधून। द्रव्यघटा ओलांडी ॥६९॥ तैसेपरी होय येते। जन्मून वीरशैव धर्माते इतरधर्मी आचारे वर्ते। अधोगती प्राप्त तया ॥७०॥ विश्वासे जे श्रवण करिती। तयाची सर्वव्यथाहरती। पठण करितां धनाढ्य होती। कीर्ति भोगिती अपार ॥७१॥ पुत्रइच्छा धरून मनीं। तत्परहोती

पारायणी। तयाचाविस्तार तत्क्षणी। होय जाण शिवकृपे ॥७२॥ हा परमरहस्य ग्रंथ भांडार। वीरशैवधर्माचे बीजांकूर। भावेकरितां रक्षण सत्वर। भवबाधा नोव्हे तया ॥७३॥ श्रोते शिवगण समस्त। तया विनवी किंकरमन्मथ। ग्रंथ समाप्तीस अज्ञा घेत। सग्ददचित्तीं होऊनिया ॥७४॥ कपिलधार भूकैलासी। आरण्यस्थान रम्यमानसी। ग्रंथ संपविला अविनाशी। जन्मसार्थक हेचीपै ॥७५॥ शके। १५२२। पंधराशें बावीस। विक्रम नामसंवत्सरास। शुद्धत्रयोदशी माघमास। ग्रंथपूर्ण झालासे॥ इतिश्री परमरहस्य सारामृत। टीकाकरूनी प्राकृत। कृतकृत्य मन्मथ। सप्तदशमोध्यायसंपूर्णमस्तु ॥७७॥

# - समाप्त -

## आरती मन्मथ स्वामींची

( रचयिता:– शिवदास )

आरती शिवराजा मन्मथ स्वामी महाराजा।
वेदांताचे सार, मुख्य पेरिलें बीज ॥ धृ ॥
समाधि महास्थळीं, सर्प व्याघ्रांची जाळी।
निर्वैर श्वापदें हो, समदृष्टीने न्याहाळी ॥ १ ॥
शिवभक्ति लोप झाली, विश्व शिवमय केलें।
ग्रंथ हा परम रहस्य, गुह्य प्रकट केलें ॥ २ ॥
अभंगी निरुपण, अनुभविले ज्ञान।
आनंद शिवदास, सर्वशुभ कल्याण ॥ ३ ॥

# द्वादश - ज्योतिर्लिंग - आरती

कर्पूर आरती अर्पण करितो द्वादश ज्योतिर्लिंगाला
सर्पविभूषित दर्पविनाशक जगद्वंद्य शिवलिंगाला ॥१॥
सृष्टि-कष्ट विनाशक श्रेष्ठ श्रीयुत ज्योतिर्लिंगाला
निष्ठायुत भज सौराष्ट्राधिश सोमनाथ शिवलिंगाला ॥२॥
सोन्नलापूर सिद्धराम नित पूजित ज्योतिर्लिंगाला
पन्नग-भूषण श्रीशैलवासी श्री मल्लिनाथ शिवलिंगाला ॥३॥
सुजनपालकर कुजनशूलकर उज्वल ज्योतिर्लिंगाला
राजसुपूजित उज्जनिश श्री महांकाल शिवलिंगाला ॥४॥
भक्तांकित संकेत मुक्त जय कलिमल हारकलिंगाला
वेंकट पूजित ॐकारनिवासी ममलेश्वर शिवलिंगाला ॥५॥
सर्वसुरार्चित गर्वविनाशक पर्वकोश सुलिंगाला
सर्वेश्वर सकलांतक परळी वैद्यनाथ शिवलिंगाला ॥६॥
सौख्यहास्यकर दुःखनाशकर सुकांत ज्योतिर्लिंगाला
भक्तिमुक्तीकर डाकिन्यान्वित भीमाशंकरलिंगाला ॥७॥
सत्यप्रियकर मिथ्यप्रलयकर उत्तम ज्योतिर्लिंगाला
नित्यसुरासुर पूजीत सेतू रामेश्वर शिवलिंगाला ॥८॥
योग्यध्यानधर भोगभंगकर जागृत ज्योतीर्लिंगाला
जगद्भाग्य भास्कर जय औंढें नागनाथ शिवलिंगाला ॥९॥
विश्वपालका विश्वशूलका सुशील ज्योतिर्लिंगाला
विश्वमान्य विश्वार्चित काशी विश्वनाथ शिवलिंगाला ॥१०॥
संगलयकर भंगभयकर शंभूरूप श्रीलिंगाला
अंबप्रियकर मंगलांगधर नाशिक त्र्यंबक लिंगाला ॥११॥
रुद्ररूपधर भद्ररूपकर उदार ज्योतीर्लिंगाला
सदाशुभंकर मदनांतक केदार सुभूषण लिंगाला ॥१२॥
पावनगात्रा स्तवनसुपात्रा निवांत ज्योतिर्लिंगाला
देवसुपूजित भावसमर्पित घृष्णेश्वर शिवलिंगाला ॥१३॥
निशिदिनीं गातो प्रशांतभावे जगद्वंद्य शिवलिंगाला
बसव विनवितो प्रसन्न होण्या द्वादश-ज्योतिर्लिंगाला ॥१४॥

## "श्री १००८ जगद्गुरु पंडिताराध्यो विजयते"

## आरती श्री जगद्गुरु पंचाचार्यांची

मंगलमय महा लिंगोद्भव गुरु शिवांग पंचाचार्यांना ।
लिंग विभुषित भंगभयादी मंगल आरती करु त्यांना ।। धृ ।।
जन्ममरण भय हरण करोनी पावन करिसी भक्तांना ।
तनु मन भावे अर्पण करितो सिद्ध रेणुकाचार्यांना ।। १ ।।
थोर घोर भव दूर कराया सुरवर भाकिती तवकरुणा ।
वीरशैवमत वारिधिशशिधर सार दारुकाचार्यांना ।। २ ।।
लोक दयाळा सर्व व्यापका अससी बोधक सकलांना ।
शोकनाशका भाकितो करुणा एकोरामाराध्याना ।। ३ ।।
चंडमताशी खंडन करुनी बोधिसी ब्रह्मखंडाना ।
पिंडी ब्रम्हांडी गुरु व्यापका नमितो पंडिताराध्याना ।। ४ ।।
विश्वेश्वर लिंगोद्भव होसी विश्वपालका दया घना ।
ईश्वर भक्तिसी शाश्वत करित्या स्मरितो विश्वाराध्याना ।। ५ ।।
अज्ञ बांधवा सुबोध कराया नमितो पंचाचार्यांना ।
वीर गोत्रोद्भव सांब विनवितो कृपा करावी या दिना ।। ६ ।।

## आरती भिमाशंकराची

( रचयिता :– श्री माजलगांवकर महाराज )

आरती भिमाशंकरा ज्योतिर्लिंग परात्परा ।
ओवाळितो कर्पूर शिवगौरा । भिमाशंकरा ।। धृ ।।
भक्त सोडूनी बहूदूर । मंदिर तुझे दरी खोर ।
सत्व पाहसी खरोखर । भिमाशंकरा ।। १ ।।
भीमा निघुनी तुझे चरणी । पावन करिती सर्व धरणी ।
करणी आहे तुझी न्यारी । भिमाशंकरा ।। २ ।।
गगन भेदी तुझे शिखर । पाहता पाप ताप हर ।
सन्मुखी उभा नंदीश्वर । भिमाशंकरा ।। ३ ।।
एक आरती तुझला राया । शोक नाशक शिवराया ।
भाकितो शंभो गौरी वरा । भिमाशंकरा ।। ४ ।।
भूकैलास खरोखर । कमलजा देवी अवतार ।
करितो प्रभू नमस्कार । भिमाशंकरा ।। ५ ।।

श्री सद्‌गुरु मिस्कीन स्वामी संचलित तपोरत्नं ग्रंथमाला
संस्थानमठ - माजलगांव

## ☰ आधारस्तंभ

- श्रीमती गं. भा. चन्नम्मा बसय्या स्वामी गड्डगीयमठ गंगामसला यांनी थोर व उदार अंतःकरणाने प्रकाशन कार्यास १०००१/– रु. ची देणगी दिली.
- बीड येथील गुरुभक्त श्री. उत्तरेश्वरआप्पा गुर्लिंगआप्पा मिटकरी यांनी थोर व उदार अंतःकरणाने प्रकाशन कार्यास १३००१/– रु. चीं देणगी दिली.

## ◆ आश्रयदाते ◆

आजपावेतो प्रकाशन कार्यास धर्मप्रेमी सद्‌भक्तांनी उदार अंतःकरणानें देणगी दिलेल्यांची यादी.

| देणगीदाराचे नांव व गांव | | रुपये |
|---|---|---|
| श्री. रामलिंग भिमाशंकर पंचाक्षरी, लातूर | – | १००१ |
| श्री. दिगंबर माधवराव झुंजे पाटील, हरंगुळ खुर्द | – | १००१ |
| श्री. वसंत मारुती मुकडे, चिखली | – | १००१ |
| श्री. तात्याप्पा बुवाजी थळकरी, युसुफ वडगांव | – | १००१ |
| श्री. माणिकराव विनायकराव पाटील, धनेगांव | – | ७५१ |
| श्री. वामनराव सोमनाथआप्पा गुजर, धनेगांव | – | ७५१ |
| श्री. महालिंग कोंडीबा झाडबुके, नांदुरघाट | – | ७०१ |
| श्री. चंद्रभान महादवा पाटील ( बिडवे ), मसला | – | ५२१ |
| सौ. महादेवी पिता संगप्पा पंचाक्षरी, लातूर | – | ५०१ |
| श्री. गणपतराव माली पाटील, कानडी बोरगाव | – | ५०१ |
| श्री. विठ्ठल तात्या सरवदे, ढोरगांव | – | ५०१ |
| श्री. शिवलिंग लक्ष्मणआप्पा गुळवे | – | ५०१ |
| श्री रावसाहेब महादेव पाटील, हसेगांव | – | ५०१ |
| श्री. खंडप्पा गेनप्पा पळसे, शिरूर | – | ५०१ |

| देणगीदाराचे नांव व गांव | | रुपये |
|---|---|---|
| कै. गं.भा. प्रयागबाई यांचे स्मरणार्थ विश्वनाथप्पा नष्टे, काळेगांव | – | ५०१ |
| श्री. ज्ञानोबा देवराव वांगसकर, मसला | – | ५०१ |
| श्री बापूराव मार्तंड पाटील, मसला | – | ५०१ |
| सौ. फुलाबाई कुंडलीक बुलबुले, भोसा | – | ५०१ |
| श्री. निवृत्ती कुणाजी गिराम, रायघावन | – | ५०१ |
| श्री. रामचंद्र विनायक खडके, बीड | – | ५०१ |
| श्री. श्रीमंत त्रिंबकआप्पा पाटील, हरंगुळ बुद्रूक | – | ५०१ |
| श्री. शंकर यादवराव बुलबुले, सामणगांव | – | ५०१ |
| श्री. शिवराज शिवमूर्ती बुलबुले, सामणगांव | – | ५०१ |
| सौ. संगव्वाबाई बेलवाले, बार्शी | – | ५०१ |
| श्री. भगवानआप्पा कोरे, परळी | – | ३११ |
| श्री. विलास ज्ञानोबाआप्पा, लांडगे माजलगांव | – | ३११ |
| श्री. दत्ताप्पा शेटे नित्रूडकर, माजलगांव | – | ३०१ |
| श्री शंकरप्पा यशवंतआप्पा झोरी, मोहा | – | ३०१ |
| श्री. शिवदास बापूराव बुलबुले, भोसा | – | ३०१ |
| श्री दगडूआप्पा विरण्णा खोत, माजलगांव | – | ३०१ |
| श्री. धोंडीराम मार्तंडराव घुमाळ, मसला | – | २७६ |
| श्री. लिंबआप्पा शिवलिंगआप्पा धाराशिवे, आलमला | – | २५५ |
| कै. संगय्या गुरुमूर्ती हिरेमठ यांचे स्मरणार्थ श्रीकंठ संगय्या हिरेमठ, सोलापूर | – | २५१ |
| श्री. सिद्रामआप्पा व्हनप्पा कोरे ( गोरे ), सोलापूर | – | २५१ |
| श्री. बाबूआप्पा मुकुंदआप्पा बेदरकर, ह. निबगांव | – | २५१ |
| श्री. मल्लिकार्जून भाऊसाहेब काटकर, मंगरूळ | – | २५१ |
| श्री. भिमाशंकर मल्लिकार्जून काटकर, मंगरूळ | – | २५१ |
| श्री दत्ताप्पा पारप्पा काटकर, मंगरूळ | – | २५१ |
| श्री. शिवपूत्र बापुआप्पा हालगे, केज | – | २५१ |
| श्री. आण्णासाहेब बापूआप्पा राजमाने, कळंब | – | २५१ |
| श्री. विश्वनाथ रामेश्वर किलचे, मसाखंडेश्वरी | – | २५१ |
| श्री. शिवराम चिमणआप्पा सांडेगांवकर, धामणगांव | – | २५१ |
| श्री. प्रभूआप्पा लक्ष्मणआप्पा गुळवे, सोममोहा | – | २५१ |
| श्री. महारुद्र सदाशिवआप्पा झोरी, मोहा | – | २५१ |
| श्री. सिद्धलिंग सदाशिवआप्पा सांवरे, शिरूर | – | २५१ |
| श्री विश्वनाथ पांडुरंग आंधळकर, नांदूरघाट | – | २५१ |

| देणगीदाराचे नांव व गांव | | रुपये |
|---|---|---|
| श्री, चंद्रकांत विश्वनाथ आम्बागिरे, दिग्रुड | – | २५१ |
| श्री शिवलिंग निवृत्ती वराडे, कानडी बोरगांव | – | २५१ |
| श्री. राजाभाऊ तात्याबा पाटील, कानडी बोरगाव | – | २५१ |
| श्री. माणिक दत्तात्रय विभूते, कानडी बोरगांव | – | २५१ |
| श्री. महालिंगआप्पा श्रीपतीआप्पा थळकरी, इसुफ वडगांव | – | २५१ |
| श्री. सोमनाथआप्पा गणपतराव थळकरी, इसुफ वडगांव | – | २५१ |
| श्री. रामलिंगआप्पा बाबूराव थळकरी, इसुफ वडगांव | – | २५१ |
| श्री. रंगनाथ तुकारामआप्पा थळकरी, इसुफ वडगांव | – | २५१ |
| श्री. त्र्यंबक विनायक खडके, उस्मानाबाद | – | २५१ |
| श्री. प्रभूआप्पा शिवमूर्ती लोखंडे. होळ | – | २५१ |
| श्री. नागनाथ बापू खिचडे, अलमला | – | २५१ |
| श्री. पारप्पा गंगाराम हुरदळे, अलमला | – | २५१ |
| श्री. सिद्धलिंगआप्पा धाराशिवे, अलमला | – | २५१ |
| श्री. चंद्रशेखर इरप्पा हुरदळे, अलमला | – | २५१ |
| श्रीमती भागीरथीबाई कापसे, अलमला | – | २५१ |
| श्री. राचप्पा रामभाऊआप्पा महाजन, माजलगांव | – | २५१ |
| श्री. बबनआप्पा आनेबाआप्पा खुरपे, माजलगांव | – | २५१ |
| श्री. मल्लप्पा रामभाऊआप्पा महाजन, माजलगांव | – | २५१ |
| श्री. राजाराम लक्ष्मण धुमाळ, मसला | – | २५१ |
| श्री. महालिंग मार्तंडराव धुमाळ, मसला | – | २५१ |
| श्री. सोपान बाळाजी घवले, टाकळगांव | – | २५१ |
| श्री. शिवाजी संभाजी घवले, टाकळगांव | – | २५१ |
| श्री. शंकर निवृत्ती घवले, टाकळगांव | – | २५१ |
| श्री. विठ्ठल नागप्पा घवले, टाकळगांव | – | २५१ |
| श्री. किसनराव तुकाराम घवले, टाकळगांव | – | २५१ |
| श्री. पांडुरंग कृष्णाजी गिराम, रायघावन | – | २५१ |
| श्री. बळीराम गणपतराव पाटील, जायफळ | – | २५१ |
| श्री. दौलतराव बाबाराव पाटील, हरंगुळ ( बु. ) | – | २५१ |
| श्री. काशीनाथ राजाराम पाटील, हरंगुळ ( बु. ) | – | २५१ |
| श्री. माणिकराव त्र्यंबकराव पाटील, हरंगुळ ( बु. ) | – | २५१ |
| श्री. लिंबराज कृष्णाप्पा बुलबुले, सामनगांव | – | २५१ |

## तपोरत्नं ग्रंथमाला प्रकाशन संस्थानमठ माजलगांव.

### – प्रकाशित ग्रंथ –

- प्रथम रत्न – श्री संत शिरोमणी मन्मथ स्वामी कृत श्री परमरहस्य
  ता. १९-६-८३ प्रथमावृत्ती प्रतो १०००
  ता. ७-२-८४ द्वितीयावृत्ती प्रती २०००
- द्वितीय रत्न– श्री रुद्र ( शिवपूजाविधीसह ).
- तृतीय रत्न– श्री चन्नाकृत अभंगगाथा



### – पुस्तके मिळण्याचे ठिकाण –

- मठसंस्थान माजलगांव–४३११३१ जि. बीड ( महाराष्ट्र )
- श्री जगद्गुरु पंडिताराध्य वीरशैव विद्यार्थी वसतिगृह,
  मकाई गेटजवळ, औरंगाबाद–४३१ ००१

( किंमत १२ रुपये )

मुद्रक :– वसुधा प्रिन्टर्स, ८५।४ रविवार पेठ, सोलापूर. ☎ : ५६२५